# घरकुल

नाटक

अनंत काणेकर




कॉंटिनेंटल प्रकाशन १०

—इबसेनच्या ' A Doll's House ' या विख्यात नाटकाची ही मराठी प्रतिकृति आहे. शुद्ध मराठी वातावरणाला कुठें बाध येऊं नये म्हणून मुळांतल्या एक दोन प्रसंगांत आणि कांहीं संवादांत मी थोडे फेरफार केले आहेत. म्हणूनच या मराठी कृतींतल्या दोषांची सर्व जबाबदारी माझी आहे; गुणांचें बरेंचसें श्रेय मात्र मूळ नाटककाराला दिलें पाहिजे.

—अनंत काणेकर.

माझे मित्र श्रीयुत अनंत काणेकर, यांनीं आपल्या घरकुल या अनुवादित नाटकाला मीं प्रस्तावना लिहावी अशी आग्रहाची इच्छा प्रदर्शित केल्यामुळें, मी हे चार शब्द लिहिण्यास प्रवृत्त झालों आहें. नाहींतर, वास्तविक रीतीनें पाहातां श्री. काणेकर याच्या कोणत्याहि ललित-लेखन-कृतीला आतां प्रस्तावनेच्या पाठ-राखणीची गरज नाहीं: व स्कँडिनेविअन् नाटककार इब्सेन यांच्या "डॉल्स् हाऊस्" या जगद्विख्यात नाटकाला तर नाहींच नाहीं. ज्या नाटकानें आज उणी पुरी पाऊणशें ऐशीं वर्षे आधुनिक नाट्यवाङ्मयांतील श्रेष्ठतम कृति म्हणून मानाचें स्थान पटकावलें आहे, त्याची प्रस्तावना लिहून आज नव्यानें ओळख काय करून देणार ! मराठी नाटककारांतील आजचे एक अग्रेसर श्री. भा. वि. वरेरकर यांनी चाळीस वर्षांपूर्वी, आपल्या ऐन विशीच्या अमदानींत, किंबहुना त्या वयाच्याहि आंतच-ज्याची नाटकें वाचून तो शेक्सपीअरपेक्षां श्रेष्ठ आहे असें स्वतःशीं ठरविलें, त्या इब्सेनची आज महाराष्ट्राला नव्यानें ओळख पटवून देण्याची काय गरज असणार ? पण दुर्दैवानें श्री. वरेरकर यांनीं एवढ्याशा अल्पवयांत आपल्याला लागलेला हा शोध, त्याच वेळीं केवळ विनयजन्य संकोचानें मराठी वाचकांपुढें धडाडीनें न मांडल्यामुळें त्यांच्या बैठकींतील कांहीं विश्वस्त माणसांपलीकडे सामान्य मराठी लेखक वाचक वर्गापर्यंत तो पोहोंचू शकला नाहीं. श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांसारखे प्रतिष्ठित नाटककार व साहित्य पण्डित देखील इब्सेन आपणाला तितकासा समजत-पटत नाहीं, असें म्हणत असत, असा प्रवाद आहे. श्री. भा. वि. वरेरकर, श्री. कोल्हटकर यांचा आपले गुरु म्हणून गौरव करीत असलेले दिसतात. इब्सेनच्या नाटकांची शेक्सपीअरच्या नाटकांवरील श्रेष्ठता तरुणपणींच पटलेल्या श्रीयुत वरेरकरांनीं आपल्या प्रौढ आणि परिणत अवस्थेंत कोल्हटकर-खाडीलकर यांना आपलें नाट्यगुरु मानावें व अभिमानपूर्वक तसा उल्लेख करावा, आणि त्यांना आपला

क्रांतिकारक शोध मात्र समजावून पटवून देऊं नये, याचा अर्थ इब्सेन संबंधांच्या त्यांच्या पहिल्या मतांत पुढें कांहींतरी परिवर्तन झालें असें समजावयाचें की काय, याचा खुलासा त्यांच्याशिवाय दुसरा कोण करूं शकणार ? पण तें कांहीं असलें तरी श्री. वरेरकर यांनी–कां असेल तें असो–इब्सेनचा, त्याच्या नाट्यतंत्राचा, त्याच्या मतप्रणालीचा आपल्या नाट्यसंसारांत किंवा इतर लेखनांत तितका स्पष्टपणें पुरस्कार केलेला दिसत नाहीं एवढें खरें. कदाचित आपला क्रांतिकारक शोध पचविण्याइतकी मराठी प्रेक्षकांची अभिरुची परिणत झालेली नाहीं, परिस्थिति परिपक्व झालेली नाहीं, असें त्यांना वाटलें असेल. असें वाटून त्यांनी त्याबद्दल मौन स्वीकारलें असेल, तर त्यांची ती भीति रास्तच होती, असें मी म्हणेन. मी असें म्हणतों तें केवळ थट्टेनें किंवा व्याजोक्तीनें नसून अगदी मनापासून म्हणतों आहें, याचें प्रत्यंतर पुढें ज्या कांहीं तपशिलाच्या गोष्टी "घरकुल" या नाटकाच्या मराठी रंगभूमीवरील आगमनाच्या आवर्तात मी नमूद करणार आहें, त्यावरून स्पष्ट होईल. तरीहि पण प्रतिकूल परिस्थितीला न जुमानता श्रीयुत वरेरकर यांनी इब्सेनच्या परंपरेचा धडाडीनें तेव्हां पुरस्कार केला असता, तर मराठी रंगभूमीची कोंडी पुरती कुजून जाण्यापूर्वीच नव्या जीवन तत्त्वाची मदत मिळून कदाचित् फुटली असती. आणि आजची अगतिक अवस्था तिला येण्याचें बहुधा टळलें असतें. "आपला दिवा पायलीखालीं झांकून ठेऊं नकोस" हा महात्मा येशूचा संदेश श्री. वरेरकर यांनीं पाळला असता, तर कितीहि थोडे कां असेनात पण कांहीं तरी नव्या विचाराचे, नव्या दमाचे, नव्या मनूचे शूर शिपाई त्यांच्या झेंडाच्या झेंड्याभोंवतीं जमले असते आणि मोर्ले यांनीं म्हटल्याप्रमाणें,

'The fact of a new idea having come to one man is a sign that it is in the air; if it has come to one, there must be hundreds of others to

whom it might have just missed coming"

असा आशादायक अनुभव त्यांना आला असता. परंतु केशव सुतांनीं काव्याच्या प्रांतांत जें बंडाचें निशाण उभारलें तेंच नाट्याच्या प्रांगणांत नाचवावयाचें धैर्य श्री. वरेरकरांनीं दाखविलें नाहीं; यामुळें केशवसुतांच्या नेतृत्वाखालीं आधुनिक विचारांच्या कवींची परंपरा निर्माण होऊं शकली, तशी मराठी नाट्यवाङ्मयाच्या व नाट्यप्रयोगांच्या बाबतींत होऊं शकली नाहीं, हें दुर्दैव होय. श्री. वरेरकर आपल्या अकलुषित व सहजावस्थ बुद्धीला सुदैवानें लागलेल्या शोधाचा जर खरोखरीच पहिल्यापासून तडजोडीची वृत्ति न स्वीकारता बंडखोरपणानें पुरस्कार करते, तर मराठी नाट्य-सृष्टींत तेव्हांच क्रांति झाली असती, एवढा त्यांना ज्याचें दर्शन होऊन साक्षात्कार झाला होता तो शोध प्रभावी होता; पण परिस्थितीच्या पेंचामुळें, किंवा तिच्या काल्पनिक भीतीमुळें इब्सेनला गुरु करण्याचें धैर्य त्यांना झालें नाहीं. ते गावठी गुरु शोधीत बसले. केशवसुताप्रमाणें "बंडाचा झेंडा" उभाविण्याची घोषणा करण्याचा आत्मविश्वास त्यांना वाटला नाहीं. अस्सल आदर्शाऐवजीं त्याच धर्तीच्या दुय्यम दर्जाच्या प्रयोगांचें अनुकरण सुधारणा म्हणून ते रंगभूमीवर आणूं लागले. क्रांतीसाठीं परिस्थिति परिपक्व झाली असतां क्रांतिकारक घोषणा व कार्यक्रमांऐवजीं सुधारणावादी नावीन्यांचा बडेजाव माजवून, त्यांचें कौतुक करून, लोकांचें लक्ष त्यांनीं त्या बाजूला चलित केल्यामुळें नवी निर्मिती होऊं शकली नाहीं. तकलादी ताकदीच्या आभासात्मक नवजीवनावर कुजलेला डाव तसाच पुढें चालू राहिला आणि अखेरीस खुद्द वरेरकरानांच, त्यांना जें वाटत होतें तें योग्य वेळीं बोलण्याचें धैर्य न दाखविल्यामुळें इमर्सन्नें सांगितलेला,

"Else tomorrow a stranger will say with masterly good sense precisely what we have thought and felt all the time and we shall be

forced to take with shame our own opinion from another"

असा अनुभव आज प्रत्यक्ष अनुभवावा लागला. वरेरकर आणि शॉ-यांच्या संबधांबद्दलची मराठी वाचकांना आणि प्रेक्षकांना निदान ऐकीव बातमी तरी होती, परंतु इब्सेनबद्दलच्या आपल्या शोधाचें गुपित त्यांनीं अगदीं परवांपर्यंत उघडें न केल्यामुळें आज त्यांच्यावर त्यांच्या त्या सत्याच्या जाहीरनाम्याबद्दल कुचेष्टेच्या आणि अविश्वासाच्या चौकशांचा वर्षाव होण्याची वेळ आली आहे. श्री. वरेरकर यांना याबद्दल वाईट वाटणार नाहीं, याची मला जाणीव आहे; परंतु त्यांनीं आपला शोध वेळींच न कळविल्यामुळें आम्हां मराठी वाचकांचें आणि रंगभूमीच्या हितचिंतकांचें जें नुकसान झालें, आम्हांला जें अनेक वर्षें त्यानंतरही अज्ञानांत रहावें लागलें, त्याबद्दल आम्हांला दुःख झाल्याशिवाय कसें राहील !

इब्सेनबद्दल महाराष्ट्रांत जें कुतूहल निर्माण झालें तें १९२०–२२ च्या सुमाराला—कदाचित् त्याच्या थोडें आगमागें—असावें. श्री. गडकरी यांनीं इब्सेनची नाटकें वाचलेलीं असावीत, असें त्यांच्या नाटकांतील कांहीं भागांवरून, विशेषतः राजसंन्यास या नाटकांतील उपनायिकेच्या स्वभाव रेखाटनावर इब्सेनच्या Vikings नाटकांतील नायिकेच्या स्वभावचित्रणाची जी दाट छाया पडल्या-सारखी वाटते, त्यावरून मी अनुमान करतों. वस्तुस्थिति काय असेल ती त्यांचे परिचित व मित्रच सांगूं शकतील. श्री. श्री. कृ. कोल्हटकर यांना इब्सेनबद्दल आदर नव्हता. याचा उल्लेख वर आलाच आहे. एकंदरींत ज्येष्ठ नाटककारांपैकीं इब्सेनचीं नाटकें कोणी वाचलीं असलीं, तरी त्यांपैकीं कोणालाहि त्याच्या तंत्रानें, तत्त्वज्ञानानें मोहिनी घातली नव्हती हें उघड आहे. श्री. वरेरकर यांच्या नाटकांवर इब्सेनच्या अभ्यासाचा पुसट पुसट परिणाम उघड दिसतो, पण त्याचें तंत्र किंवा दृष्टिकोण यथार्थपणें आत्मसात् करण्या-

ऐवजीं, येथील अभिरुचीला पटेल, पचेल असें आपल्या कल्पने-प्रमाणें त्यांचें रूपांतर करण्याची प्रथा त्यांनीं सुरू केल्यामुळें, तंत्र आणि विचारांच्या मांडणीची पद्धती, यांच्या दृष्टीनें त्यांच्या नाटकांचें स्वरूप आड गिऱ्हाइकी मालाप्रमाणें झालें आहे.

स्थल, काल, रस किंवा परिणाम, यांच्या ऐक्यांना इब्सेनच्या नाटकांतील तत्रांत प्राधान्य आहे, यामुळें एक अंक एक प्रवेश अशी त्याची सहज व स्वाभाविक रचना होते. ही मौलिक गोष्ट लक्ष्यांत न आल्यामुळें उथळपणें अनुकरण करूं पाहाणारे नकल्ये, इब्सेनच्या तंत्राचें नाटक म्हणजे ज्यांत एकेक अंक एकेकाच प्रवेशाचा असतो तें, अशी आपली भ्रामक समजूत करून घेऊन स्थलकाल व वस्तु किंवा रस याचें ऐक्य नसतांहि कशीहि आटापीट करून एकांक प्रवेशी नाटकें लिहिण्याचा अट्टाहास करीत असलेले आढळतात. स्थल–काल-व परिणाम किंवा रस या त्रयींतील ऐक्याची कल्पना मूळ ग्रीक नाटकांतून आधुनिक यूरोपीअन् नाटककारांना उचलली. इब्सेन्चें समकालिन ब्यॉर्नसन् व स्ट्रिंड्बर्ग यांनींहि ती स्वीकारली आढळते.

आमच्यांतील बऱ्याच जुन्या आणि जाणत्या नाटक-कारांना ही अंकप्रवेशाची विभागणी, तिचें वास्तविक साध्य काय तें माहित नसल्यामुळें, कृत्रिम व परकी वाटते; पण ही विभाग-पद्धती खरोखर आम्हांला परकीय नाहीं. तिला सर्व संस्कृत नाट-कांच्या रचनेचा पाठिंबा आहे. परंतु मराठी रंगभूमी भारतीय नाट्याच्या परंपरेतून परिणत होण्याऐवजीं इंग्रजी, शेक्सपीआरिअन् परिपाठाच्या नाटकांतून पुनरुज्जीवित झाली असल्यामुळें, तें इंग्रजी तंत्रच आमच्या नाटककारांना आपलेसें वाटूं लागलें. आपल्या वास्तविक पुराण परंपरेचा त्यांना विसर पडला. इतका विसर पडला कीं त्यांना ती आपली घरची भारतीय नाट्यरचना पद्धति कृत्रिम आणि प्रतिकाराला योग्य वाटावयाला लागली आणि खरोखरी जी परकी आणि कमी परिणामकारक आंग्ल रीती, ती ते आपली समजून तिचें रक्षण आणि प्रतिपालन करण्याला उद्युक्त झाले. स्थल–काल–रस

या त्रयींचे ऐक्य राखणें हें इब्सेनिअन्, ग्रीशिअन् किंवा संस्कृत नाट्यरचना तत्राचें साध्य होय. एक अंक एक प्रवेशी लिहिणें, किंवा नाटकांतर्गत सर्व घटना एकाच विशिष्ट स्थळीं घडलेल्या असतील अशा निवडून घेणें, हें त्याचें साधन आहे. इब्सेननें हा विवेक ठेवूनच आपल्या नाट्यस्थलांची व अंकप्रवेशांची मांडणी केलेली आहे. कोणत्याहि विशिष्ट यांत्रिक नियमांचा तो दास झालेला नाहीं ज्यांचें ऐक्य साधावयाचें त्या तिहींतहि तो तरतमभावाचा विवेक पाळून परिणामैक्याला सर्वांत जास्त महत्त्व, प्रमुखस्थान देतो, आणि त्याच्या अनुरोधानें व अनुषंगानें बाकीचीं दोन ऐक्यें तो साधीत असतो. ही महत्त्वाची गोष्ट न समजल्यामुळे एकांक प्रवेशाचें कांहींकडून भलतेंच स्तोम माजविलें जाणें, तर उलट कांहींकडून नावीन्य म्हणूनच त्याची कुचेष्टा होणें, या दोन्ही आते रेकाच्या गोष्टी अगदीं सहजच क्रमप्राप्त ठरतात. आज मराठी नाट्यवाङ्मयामध्यें ही दोन्ही टोकें गाठलेलीं पाहावयाला सापडतात.

इब्सेनच्या नाट्यतंत्राचा दुसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे कथानकाची घडण व विषयाची मांडणी करण्याची पद्धति. शेक्सपी-अरीअन् नाटकांत नाट्यवस्तूचा उत्कर्षबिंदु तिसऱ्या अंकाच्या सुमाराला, जवळ जवळ नाटकाच्या मध्यभागीं येतो. तेथपर्यंत कथानकांतील घटना वाचकांच्या व प्रेक्षकांच्या नजरेपुढें अधिकाधिक गुंतागुंतीची प्रक्रिया निर्माण करीत असतात, आणि तो बिंदु व्यतीत झाल्यावर पुन्हां ती गुंतागुंत हळूहळू उकलावयाला लागून अखेरीला सर्व धागेदोरे अलग अलग होतात व वाचक प्रेक्षकांना नाटकांतर्गत समस्या पूर्णपणें उकललेली, सुटलेली, पुरी झालेली, अशा स्वरूपांत आढळते. इब्सेनिअन् नाट्यतंत्र यापेक्षां निराळें आहे. त्या प्रकारच्या नाटकाला नाट्यवस्तूच्या उत्कर्षबिंदूपासूनच सुरुवात होते. यामुळें पहिल्या अंकांतील बराच भाग त्या उत्कर्ष-बिंदुरूपी घटनेची पार्श्वभूमि, त्या घटनेशीं निगडित असलेल्या व्यक्तींचे किंवा भूमिकांचे व्यावहारिक आणि भावनात्मक परस्पर

संबंध, त्या घटनेला कार्यकारण भावसंबंधांनीं चिकटलेल्या इतर घटनांची आणि घटकांची आवश्यक ती माहिती, इत्यादि तपशिलांत खर्ची पडतो. आणि त्या पुढील सर्व भाग, त्यांतील बाकीचे सर्व अंक, हें एकप्रकारें त्या घटनेची उकल, विशदीकरण, विश्लेषण याचें कार्य करीत असतात. मनाला चटका लावणारी गोष्ट अशी आरंभींच सांगितल्यामुळें, वाचक प्रेक्षकांचें अंतःकरण नाटकाच्या पुढील भागांत गुंतून राहील इतके ते भाग मनोरंजक, आकर्षक, सुसंगत व परिणामकारक करण्यास नाटककाराच्या लेखणींत तितकीच अलौकिक शक्ति, त्याच्या संदेशांत तितकेंच दिव्य सत्य, त्याच्या नाटयकलेंत तितकाच जोरदार जिवंतपणा, त्याच्या विवेचनांत तितकाच तर्क शुद्धपणा असला पाहिजे हें उघड आहे. या तंत्राचा अवलंब करून नाटक लिहिणें, हें येरागबाळाचें काम नव्हे. त्याला उत्कट नाटयप्रतिभेची, भरदार तात्त्विक भूमिकेच्या अधिष्ठानाची जरूरी असते. इब्सेनच्या ठिकाणीं या दोन्ही गोष्टी प्रकर्षानें आढळून येतात: आणि यामुळेंच आधुनिक नाटककारांच्या खगोलांत उच्चतम असें ध्रुवपद त्याला प्राप्त झालेलें आहे.

इब्सेनची नाटकें समस्यापर आहेत. पण तो समस्या सोडवून दाखवीत नाहीं. तो तयार उत्तरें देत नाहीं. ज्यानें त्यानें ती समस्या स्वतःच सोडवावी, स्वतःचीं उत्तरें स्वतःच काढावीं, म्हणून तो समस्यात्मक घटनेची सर्व अंगोपांगें, तिचे पूर्वापर कार्यकारणभाव, तिची पार्श्वभूमी, तिच्याशीं संबद्ध असलेले मानवी—अर्थातच भावनात्मक—स्वरूपाचे विशेष आणि वैयक्तिक घटक, तिचा संभवनीय असा सामाजिक, नैतिक व राजकीय अर्थ व परिणाम, तिचें ऐतिहासिक महत्त्व इत्यादि गोष्टी, जितक्या विशदरीतीनें, जितक्या अधिक व्यापक दृष्टीनें, जितक्या अधिक अंगांनीं, जितक्या नाटयमयपद्धतीनें, व जितक्या खऱ्याखुऱ्या जिवंत हाडामांसाच्या व्यक्तींकडून, वदवितां येतील तितक्या व्यक्तींकडून व

तितक्या रीतींनीं आपल्या नाटकांतून तो वदवित असतो. त्याची नाटकें केवळ कलावन्ताच्या दृष्टीनें लिहिलेलीं नसतात, तीं केवळ नीतिसंरक्षकांच्या समाधानासाठीं लिहिलेली नसतात. त्यांत केवळ स्त्रियांचा किंवा केवळ पुरुषांचा दृष्टिकोण मांडलेला नसतो, केवळ राजकीय, केवळ सामाजिक, केवळ आर्थिक, केवळ उच्चवर्गीय, केवळ मध्यमवर्गीय, केवळ श्रमिक वर्गीय, अशा कोणत्याही केवळ एकाच वर्गाच्या हिताच्या संरक्षणासाठीं तीं अवतरलेलीं नसतात. संपूर्ण सत्याचा वैयक्तिक परिमाणानें आविष्कार करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. केशवसुतांप्रमाणेंच, तो जे 'साकल्याचा प्रदेश आंखडतात' त्यांना 'पतित' समजतो. 'साकल्य' हें त्याच्या विचाराचें क्षेत्र आहे. व्यक्ती हें त्या साकल्याचें किमान परिमाण— केन्द्र— आहे. व्यक्तीला स्वतःचें स्वातंत्र्य शाबूत ठेवून जगण्याचा जो हक्क त्याचें आक्रमणापासून संरक्षण करण्यासाठीं झगडावयाची तयारी ही त्याला नाट्यलेखनाला उद्युक्त करणारी प्रेरणा आहे. सर्वांठायीं समता पाहाणारी व्यापक उदार बुद्धि हा त्याचा दृष्टिकोण आहे. तर्कशुद्धता हा त्याच्या सर्व विवेचनाचा निकष आहे. मानवतेंतील मूलभूत चांगुलपणा ही त्याची श्रद्धाशक्ति किंवा त्याचें तात्त्विक अधिष्ठान आहे. वाङ्मयीन 'महात्मते'चें कोणतेंही अंग त्याच्या ठिकाणीं उणें नाहीं. नुकतेंच बडोदा येथील सम्मेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत सबंध सत्याचें दर्शन करविणें हें खऱ्या साहित्यिकाचें ध्येय असलें पाहिजे, म्हणून श्री. काणेकर यांनीं जी अपेक्षा प्रदर्शित केली, ती जर कोणा साहित्यिकाचे लेखनांत यथार्थपणें पूर्ण होत असेल तर ती इब्सेनच्याच होय. आणि याचमुळें एक युग प्रवर्तक, द्रष्टा, म्हणून त्याची साहित्यिकांत गणना केली जाते.

इब्सेनच्या वाङ्मयाचा मला, आणि मला वाटतें श्री. काणेकर यांनाहि, नीट रीतीनें परिचय झाला तो श्रीयुत श्रीधर विनायक वर्तक बी. ए. यांच्यामुळें. श्री. वर्तक हे इब्सेनच्या नाट्य कृतींचे व्यासंगी अभ्यासक व उत्साही प्रचारक आहेत. त्यांच्या बोलण्यां-

तील इब्सेनच्या स्तुतीच्या पुनः पुनरावृत्तीमुळें इब्सेनच्या बहुतेक सर्व नाटकांचा आणि दोन नाटयकाव्यांचा आम्हाला अभ्यास करावा लागला आणि पुढें कॉलेजमधील अभ्यासक्रमांतहि प्रा. पारकर यांच्या पक्षपातामुळें आधुनिक लेखकांच्या कृतींचा समावेश युनिव्हर्सिटीकडून करण्यांत आला आसल्यानें त्याचाहि फायदा आम्हाला मिळाला.

आधुनिक इंग्रजी वाङ्मयाचा व अनुषंगानें युरोपिअन् वाङ्मयाचाहि अंतर्भाव इ. स. १९२४ पासून विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांतच झाल्यामुळें सुशिक्षित पदवीधरांना हळूहळू आतापर्यंत माहित नसलेलीं नांवें परिचित होऊं लागलीं व येथून पुढें आधुनिक युरोपियन, इंग्रजी, अमेरिकन् वाङ्मयाकडे मराठी साहित्यिकांची अभ्यासक दृष्टी वळली. इब्सेनवरहि मासिकांतून व साप्ताहिकांतून स्फुट लेख येऊं लागले. अशाच एका, श्री. गं. भा. निरंतर यांनी लिहिलेल्या, इब्सेन वरील लेखमालेचें आतां ग्रंथरूपांत संकलनहि झालेलें आहे. इब्सेनच्या " डॉलस् हाऊस्–" चें ऋण मान्य न करतां स्वतंत्र कृति म्हणून पुढें आलेलें, एक भाषांतर कांहीं वर्षांपूर्वी झालें होतें. भारताचार्य चिं. वि. वैद्य एम्. ए. यांनीं त्याला प्रस्तावना लिहिली होती व तींत ती एका मराठी लेखकाचीच स्वतंत्र कृति आहे, या गैर समजानें माफक प्रमाणांत कां होईना, गुण बाहुल्याबद्दल त्याची वाखाणणीहि केली होती. याशिवाय डाल्स् हाउस्चीं आणखीं दोन तरी भाषांतरें हस्तलिखित स्वरूपांत अस्तित्वांत आहेत, असें अहमदनगर व कऱ्हाड येथें झालेल्या त्यांच्या प्रयोगांवरून दिसतें.

इब्सेनच्या तंत्रानें मराठींत स्वतंत्रपणें लिहिलेलें पहिलें नाटक, माझ्या समजुतीप्रमाणें तरी, श्री. वासुदेव वामन भोळे, बी. ए. एल. एल. बी. यांचें " सरलादेवी " हें होय. आतां इब्सेनच्या तंत्रपद्धतीनें लिहिलेलीं बरींच नाटकें मराठींत झालीं आहेत. श्री. प्र. के. अत्रे यांच्या नाटकांचा त्यांत प्रामुख्यानें अंतर्भाव होतो. श्री. वरेरकर हेहि तशा प्रकारचीं नाटकें लिहितात; पण अद्यापि

श्री. भोळे यांच्या " सरलादेवी " इतकें इब्सेनच्या तंत्राचें शुद्ध स्वरूपांत केलेलें अनुकरण एकाहि नाटककाराकडून झालें नाहीं, अशी माझी समजूत आहे.

इब्सेनचें बरें वाईट अनुकरण आतां रूढ झालें आहे, पण त्याच्या स्वतःच्या इतर नाटकांचीं मात्र (श्री. वर्तककृत "तक्षशिला" हा एक सन्मान्य अपवाद वजा जातां) मराठींत चांगलीं भाषांतरें प्रसिद्ध होऊं शकलीं नाहींत, त्यांचे प्रयोग होऊं शकले नाहींत, हें मराठी रंगभूमीचें व मराठी नाट्यवाङ्मयाचें दुर्भाग्य होय. "डॉल्स् हाऊस् " हें वास्तविक पाहतां त्याच्या उत्कृष्ट नाटकांपैकीं एक प्रमुख नाटक; पण त्याचेंहि भाषांतर प्रसिद्ध होण्याचा, व कशा-तरी रीतीनें कां होईना पण तें रंगभूमीवर येण्याचा, योग आज इतक्या उशीरा येत आहे, हें मराठी भाषेचें फार मोठें नुकसान आहे. चाळीस वर्षांपूर्वी शेक्सपीअरपेक्षां इब्सेन हा श्रेष्ठ नाटककार आहे असा साक्षात्कार झाला, तेव्हांच जर श्री. भा. वि. वरेकर यांनीं आपल्या त्या नव्या प्रकाशाची ज्योत जनतेपुढें पाजळली असती, तर मराठी वाङ्मयाला इब्सेन इतके दिवस कां पारखा राहिला असता ? पण–पण–" होणारें न चुकेल होइल जरी ब्रह्मा तया आडवा," असें म्हणतात तेंच खरें म्हणावयाचें दुसरें काय !

श्री. काणेकर यांचें ' घरकुल ' जरी आज प्रसिद्ध होत असलें, आज रंगभूमीवर येत असलें, तरी तें लिहून तयार होऊन आज उणीपुरीं अकरा बारा वर्षें झालेलीं आहेत. नाट्यमन्वंतराच्या स्थापनेची कल्पना जेव्हां गर्भावस्थेंतसुद्धां नव्हती, परंतु जेव्हां मीं नाट्यसृष्टी हें आपलें कर्तव्यक्षेत्र निश्चित करून चित्रपटाच्या व्यवसायांत प्रवेश केला होता, तेव्हां आपल्या रंगभूमीवरच्या काम-गिरीसाठीं त्याची निवड केली होती. श्री. पार्श्वनाथ आळतेकर, कु. दुर्गाबाई केळकर ( आतां सौ. ज्योत्स्नाबाई भोळे, ) श्री. गिरिजाबाई केळकर, आणि मी, ही मंडळी या प्रयोगांत भूमिका

करणार होती. श्री. केशवराव भोळे हे संगीताच्या कांहीं अभिनव उपक्रमाची त्याला जोड देणार होते. या नाटकाच्या तेव्हां तालमीहि सुरू झाल्या होत्या, परंतु पुढें कांहीं आकस्मिक कारणानें त्याचा प्रयोग करण्याची आमची ती योजना हुकली. त्यानंतर नाट्य मन्वंतर स्थापन झालें. त्याची सुरुवात "घरकुला"च्या प्रयोगानें व्हावी यासाठीं मीं बराच प्रयत्न केला. परंतु या नाटकाचा विषय समाजाला अप्रिय होईल, प्रयोग दृष्ट्याही नाटक बसविणें फार कठीण आणि जबाबदारीचें आहे, नाटकांतील नायिकेची भूमिका वठविण्याला कसलेली अभिनयकुशल नटी पाहिजे आणि आपल्या नटी तर अगदीं नवख्या; या व्यावहारिक आक्षेपांमुळें त्याचा प्रयोग करणें तेव्हांहि मागें पडलें, पुढें नाट्य मन्वंतरामध्यें प्रत्येक नवीन नाटक निवडावयाच्या वेळीं मीं "घरकुल" चें नांव पुढें आणावयाचें व कांहींना कांहीं तरी कारणें दिलीं जाऊन, दुसरेंच एकादें नाटक घेतलें जावयाचें, असें एकंदर तीनवार झालें. अखेरीस नाट्य मन्वंतर ही संस्था बंदहि झाली, तरी पण नाट्य मन्वंतराचें पहिलें नाटक म्हणून रंगभूमीवर येईल अशी ज्याच्याबद्दल अपेक्षा होती, तें "घरकुल" नाटक रंगभूमीवर आले नाहीं, आणि यामुळें श्री. काणेकर यांनीं पुस्तकरूपानें तें प्रसिद्धहि केलें नाहीं.

आज नाट्यसंमेलनांच्या प्रसंगानें त्याचा रंगभूमीवरील व छापील संसार सुरू होत आहे. इब्सेनच्या डॉल्सहाऊस् या उत्कृष्ट नाटकाच्या श्री. अनंत काणेकरकृत "घरकुल" या प्रस्तुत भाषांतराच्या रूपानें मराठी वाङ्मयांत एक मोलाची भर पडत आहे, असा मला भरंवसा वाटतो.

२५ डिसेंबर १९४१ }<br>"मनीषा" पुणें ४ }

**के. नारायण काळे.**

# घरकुल

## १

साधारण सुखवस्तु, मध्यमवर्गीय, इंग्लंडला जाऊन आलेल्या तरुणाच्या कुटुंबाचा दिवाणखाना. स्टेजच्या अगदीं मागें बाहेरून दिवाणखान्यांत यायचा दरवाजा आहे. दरवाजावर रंगीत गॉझचे पडदे सोडले आहेत. दरवाजाच्या उजव्या बाजूला एक मोठी खिडकी आहे. अस्मानी रंगाचे गॉझचे पडदे सुंदर कमान करून खिडकीला लावलेले आहेत. खिडकींतून वर यायच्या जिन्याचा कठडा व चढून आल्यावर वळतांना हात

टेकण्याकरितां केलेला जिन्याच्या खांबाचा गोल शिरोभाग दृग्गोचर होतो. तेथेंच जिन्यावर उंच टांगलेल्या दिव्याचा कांहीं भाग दिसतो. दिवाणखान्याच्या उजव्या बाजूला एक व डाव्या बाजूला एक अशा दोन खोल्या आहेत. अर्थात्, त्यांचे नुसते दिवाणखान्यांत उघडणारे दरवाजे दिसतात. या दोन्ही दरवाजांवर सुद्धां अस्मानी रंगाचे गॉझचे पडदे कमान करून सोडले आहेत. डाव्या बाजूच्या खोलीच्या दरवाजांतून आंत असलेल्या एका रिव्हॉल्व्हिंग बुक-शेल्फचा व खुर्चीचा थोडा भाग दिसतो. उजव्या बाजूच्या खोलीच्या दारांतून आंत असलेल्या पलंगाचा थोडासा भाग दिसतो. दिवाणखान्याच्या भिंतींना अगदीं फिकट हिरवा रंग दिलेला आहे.

संध्याकाळीं पांच साडेपांचची वेळ आहे. जिन्यावरून वर येतांना दरवाजाशेजारच्या खिडकींतून लता दिसते. दरवाजा ठोकल्याचा आवाज होतो. दिवाणखान्यांतल्या वस्तूंवर फडका मारीत असलेली भिमा फडका खालीं ठेवून दरवाजाकडे जाते आणि दरवाजा उघडते.

लता जवळजवळ उड्या मारीतच आंत येते. तिच्या एका हातांत छत्री व मनीबॅग आहे, आणि दुसऱ्या हातांत एक लहानसें पुडकें आहे.

दरवाजा उघडाच रहातो.

**लता** : भिमा, खालीं जा लवकर आणि ती टॅक्सी उभी आहे, तिच्यांत दोन मोठ्ठीं पुडकीं आहेत आपलीं, तीं घेऊन ये वरतीं; लवकर जा. ( भिमा जायला वळते. )

**लता** : हं भिमा थांब. ( हातांतील मनीबॅग उघडून दोन रुपये काढते ) हे पैसे दे त्या टॅक्सीवाल्याला.

**भिमा** : सगळे द्यायचे, बाय ?

**लता** : होय, दे सगळे. काय दीड पावणेदोन रुपये बिल झालं आहे. घेऊं दे त्याला सगळे.

( भिमा जाते व लता हातांतील पुडकें टेबलावर ठेवते. ओटींतून एक दोन अमदाबादी बोरें काढून खाते. हंसत हंसत व नाचत नाचत खुंटीवर छत्री लावायला जाते; पण छत्री खालीं पडते. मोठा आवाज होतो. )

**लता** : ( चीभ चावून व हंसत ) अग बाई !

( छत्री नीट ठेवते व डाव्या बाजूच्या खोलीकडे अगदीं हलक्या पावलांनीं जाऊन आंत डोकावून पहाते. पुन्हां मागें येऊन, हांसत, डोळे मोठे करून स्वतःशीं )—स्वारी आहे आत !

( भिमा दोन मोठ्ठीं पुडकीं हातांत घेऊन वर येते व आंत येऊन दोन्ही टेबलावर ठेवते. )

**लता** : मुलं बायाआजीबरोबर फिरायला गेलीं आहेत ना, भिमा ?

**भिमा** : हो.

**लता** : तीं दोन्हीं पुडकीं अगदीं लपवून ठेव हं. मुलांना दिसतां कामा नयेत परवांपर्यंत. एकात फटाके आहेत, अन् दुसऱ्यांत खेळणीं आहेत. विजूचा वाढदिवसहि आपला दिवाळींतच येतो. गम्मत करायची अगदीं. दाखवूं नको त्यांना परवांपर्यंत हं ! जा, नेऊन ठेव तीं आंत.

( भिमा दोन्हीं पुडकीं एकदम उचलते. भिमाच्या हातांत म्यॉंव असा आवाज होतो. भिमा दचकते. )

**लता** : ( मोठ्यानें हंसत. ) अग मांजर आहे त्यांत मन्यासाठीं. त्याचं डोकं दाबलं कीं, तें म्यॉंव करतं मोठ्यानं.

( भिमा उजवीकडल्या खोलींत जाते. )

डाव्या खोलीच्या दारांत हातांत पेन्सिल घेऊन रमाकांत येतो. त्यानें बूट व पॅंट घातली आहे. नेकटाय काढून टाकल्यामुळें सुटलेली कॉलर खांद्यावर लोळते आहे.

**रमाकांत** : ( पेन्सिल हातांत हलवीत, हंसत ) तरी म्हटलं, **आहे**

काय गडबड नि कलकलाट ! मार्केटांत जाऊन आमची चिमणी घरट्यांत परत आली वाटतं ?

लता : हो, अगदीं तसंच !

रमाकांत : कधीं बरं आली ?

लता : ही काय ? अजून चपलाहि काढल्या नाहींत !

रमाकांत : आणि बरेचसे पैसे उधळून आलां असाल बाजारांत उधळाबाई ?

लता : मुळींच नाहीं. अगदीं थोडे पैसे खरचले. पण काय काय आणलं आहे ! दाखवायचं नाहीं एव्हां कुणालाच.

रमाकांत : लता ! उगाच पैसे उधळण्यासारखी आपली स्थिति नाहीं.

लता : असं काय गडे ! वर्षांतून एकदां जरा जास्त पैसे खर्च केले तर काय झालं ? नुसती दिवाळीच नाहीं, आपल्या विजूचा वाढ-दिवस पण परवांच येतो.

रमाकांत : तरी पण—

लता : हं, पुरे ' तरीपण '. इतकं अगदीं हें करायला नको कांहीं ! अन् आतां तर आपल्याला जरा जास्तकमी पैसे खर्च करायला कांहीच हरकत नाहीं. हो ! पुढच्या महिन्यापासून स्वारी मॅनेजर होणार ! मग काय ?— साडेसातशें रुपये पगार, होय ना ?

रमाकांत : अग पण, म्हणून काय आतां वाटेल तसे पैसे खर्च करून टाकायचे कीं काय ? पुढें पगार वाढणार माझा, म्हणून आत्तां कर्ज करून ठेवायचं कीं काय ? वा !

लता : मग त्यांत काय झालं ? फेडून टाकूं लगेच पगार वाढल्या-बरोबर !

रमाकांत : शाबास ! आणि मला कांहीं झालं त्यापूर्वी नी मी—

लता : ( एकदम आपला हात त्याच्या तोंडावर ठेवून ) हें काय

कांहींतरी ! असं अभद्र बोलूं नका गडे ! जळो तें कर्ज, नी मरोत ते कर्ज देणारे !

**रमाकांत** : अगदीं बायकासारखं बोललीस !—तें असो, पण खरो-खरच सांगतों तुला. कर्ज अन् उसनवारी—या गोष्टींचं नांव नको बाबा आपल्याला ! कर्जबाजारीपणावर ज्यांचा संसार चालतो त्यांना आयुष्यांत स्वतंत्रता आणि सौंदर्य म्हणजे काय आहे याची कल्पनाहि होणं शक्य नाहीं. आपण आतांपर्यंत कुणाची एक पैहि न घेतां, मोठ्या नेटानें दिवस काढले आहेत. आणि आतां आपणाला भरपूर पैसा मिळण्याचे दिवस अगदीं जवळ आले आहेत. तोंपर्यंत आपण असंच नेटानें चालवलं पाहिजे.

**लता** : ( गंभीर तोंड करून व वाईट वाटलेल्या आवाजांत ) तुमच्या म्हणण्याच्या बाहेर कां मी आहे ?

**रमाकांत** : ( तिच्याजवळ जाऊन तिच्या खांद्यावर हात ठेवतो ) अरे ! आमची चिमणी रागावली वाटतं ? लता, तसं नव्हे ग ! मी सहज एक गोष्ट सांगितली आपली. ( तुमानीच्या खिशांतून कांहीं दहा रुपयांच्या नोटा काढून ) लता, पाहिलंस हें काय आहे तें ? कुणाला बरं द्यावं हें ?

**लता** : ( वर पहाते. चेहरा एकदम हंसरा होतो. ) नोटा वाटतं !

**रमाकांत** : हुंऽऽ ! मला कळत नाहीं वाटतं, या सणावारांच्या दिवसांत तुला किती पैसे लागतात ते ! ( तिच्या हातांत नोटा देतो. )

**लता** : ( मोजीत ) एक-दोन-तीन-अगबाई-तीस रुपये ? खरंच गडे, किती तरी झाले हे. पुरून उरतील हे मला.

**रमाकांत** : ठेव ठेव. सर्व लागतील तुला ते.

**लता** : आज काय काय आणलं मी, माहीत आहे का ? कित्ती स्वस्त मिळालं सांगूं तुम्हांला ? पांच रुपयाला एवढी मोठी फटा-

ऱ्यांची टोपली. विजूला एक रेशमी सेलर सूट आणला आहे. अन् मन्या त्या दिवशीं रडत होता नाहीं का, त्या काळ्या मांजरा-साठीं ? तें सुद्धां आणलं आहे ! आणि कमासाठीं घेतली एक बाहुली आणि तेवढासाच एक पलंग आहे बाहुलीसाठीं ! कमा ठेवणार आहे म्हणा किती दिवस ! घेतल्याबरोबर फोडलीन् नाहीं म्हणजे झालं. बारा आण्यांची आहे म्हणा. फुटली तर फुटली ! आणखी बायाआजीसाठीं लुगडं आणलं एक. ती बिचारी कधीं स्वतः होऊन मागायची नाहीं. फाटून चिंध्या झाल्या तरी तसंच शिवून शिवून नेसेल.

**रमाकांत** : ( हंसून ) बायावर तुझी मोठी माया आहे हं.

**लता** : मग ! स्वतःच्या पोटच्या मुलांना कुणीं करणार नाहीं असं करते ती आपल्या मुलांना. आणि मलासुद्धां अंगाखांद्यावर खेळवलन् आहे तिनं !

**रमाकांत** : बरं पण, हें एवढं सर्व आणलंस, पण स्वतःला काय आणलंस तूं ?

**लता** : ( खालीं बघत ) मला नको कांहीं.

**रमाकांत** : ( तिच्या हनुवटीला हात लावून) वहावा ! म्हणजे ? तुला तें कसलं पातळ पाहिजे होतं ना ?

**लता** : पातळं आहेत माझीं. पण—

**रमाकांत** : पण काय ?— काय पाहिजे तुला सांग ना ?

**लता** : खरंच द्याल सांगितलं तर ?

**रमाकांत** : हो हो. शक्य असेल तर खात्रीनें देईन.

**लता** : तर मग— तर मग—

**रमाकांत** : बोल ना काय तें ?

**लता** : ( खालीं मान घालून त्याच्या शर्टच्या बटनाशीं खेळत ) रुपयेच द्या मला तर मग.

**रमाकांत** : लता !
**लता** : खरंच गडे ! मग मी नीट विचार करून कांहीं तरी चांगलंसं घेईन.

**रमाकांत** : तुला ‘ उधळाबाई ’ मी म्हणतों तें कांहीं खोटं नाहीं.
**लता** : असं काय ? मी दिवाळीची आरती करतें तेव्हां तुम्हीं मला देतांच ना कांहींतरी दरवर्षी ? मग यंदा रोख रुपये द्या. मी घेईन मला काय पाहिजे तें.— नाहीं ?

**रमाकांत** : हो. अगदीं बरोबर ! तुझ्या हातांत पैसे राहिले तर ना ?
**लता** : पण गडे—
**रमाकांत** : हो, हो, हो. घरांतच ‘ हें आण ’, ‘ तें आण ’ करून तूं पैसे खर्च करतेस तें माहित आहे मला. ( तिच्या कमरेभोंवतीं एका हातानें विळखा घालतो, व दुसऱ्या हातानें तिची हनुवटी हलवीत ) ही एवढीशी चिमणी आहे, पण खर्च किती आहे तिला ?

**लता** : अगदीं साफ खोटं आहे तें ! जिथें जिथें शक्य आहे तिथें अगदीं पैन् पैची काटकसर करतें हो मी.

**रमाकांत** : ( हंसून ) अगदीं खरं आहे. जिथें जिथें शक्य असत तिथें, होय ना ?— आणि तुला शक्य कुठंच नसतं !
**लता** : ( मनापासून स्मित करीत ) तुम्हांला कल्पना नाहीं गडे, आम्हां बायकांची ! तुम्हां पुरुषांना जरी आम्हीं ‘ चिमण्या ’ नी ‘ बुल्बुल ’ वाटलों, तरी संसारांत किती नी कसा खर्च होतो, हें आमचं आम्हांला माहीत.

**रमाकांत** : अगदीं आपल्या वडिलांच्या वळणावर गेली आहेस तूं, लता ! माझ्याकडून पैसे काढण्यासाठीं नव्या नव्या क्लृप्त्या कशा शोधून काढाव्या यांत अगदीं तरबेज आहेस तूं. आणि तुझ्या हातांत एकदां पैसे गेले कीं गेलेच. केव्हां ते उडून जातात तें समजत सुद्धां नाहीं. आणि तुझ्याहि तें ध्यानांत येत नाहीं. असो. आहेस

खरी तूं अशी. तुमच्या कुटुंबाच्या अगदीं रक्ताचाच हा गुण दिसतो.
लता : अन् माझ्या बाबांचे दुसरेहि चांगले चांगले गुण माझ्या रक्तांत उतरले असते तर किती चांगलं झालं असतं !

रमाकांत : नको नको हं ! माझी चिमणी आहे तीच बरी आहे हो.—हं, तें असो. पण तुझ्या, मनांत कांहीं तरी विचार चालला आहे आज. स्वस्थ दिसत नाहीं चित्त तुझं, होय ना ?

लता : चला, उगीच कांहीं तरी.
रमाकांत : माझ्याकडे पहा बघूं अगदीं सरळ.
लता : ( त्याच्या चेहऱ्याकडे पहात ) काय ?
रमाकांत : ( नाकासमोर बोट हालवीत ) कांहीं तरी मी नको सांगितलेलं केलं आहेस तूं आज !

लता : म्हणजे ? कशावरून म्हणतां तुम्ही हें ?
रमाकांत : हो कीं नाहीं सांग ?
लता : खरंच नाहीं, उगीच काय ?
रमाकांत : येतांना वाटेंत कांही पेरू, कैऱ्या, नाहीं तर बोरं नाहींना विकत घेतलीं ?

लता : छे, मुळींच नाहीं.

रमाकांत : अमदाबादी बोरं हल्लीं फार स्वस्त झालीं आहेत म्हटलं, आणि तुझ्या दृष्टीला एकदां तीं पडलीं, म्हणजे मला नाहीं वाटत तुझ्यानें रहावेल. (हंसतो. )
लता : खरंच नाहीं. कशी घेणार मी ? मार्केटांतून सरळ टॅक्सी करून आलें मी घरीं. ( नकळत तिचा हात ओटीत जातो. )

रमाकांत : नाहीं ग. गम्मत केली मीं तुझी जरा.
लता : हं. हं. तुम्हीं नको सांगितलेलं कधीं तरी मीं केलं आहे का ?
रमाकांत : ( हातानें तिची हनुवटी हलवीत ) नाहीं नाहीं; कध्धीं नाहीं. आतां पैशाची काळजी नको तुला, लता. माझी मॅनेजरच्या

जागेची नेमणूक झाली कीं पैसाच पैसा.

**लता** : खरंच गडे. आठ वर्षे कशीं ताणाताणीनें काढलीं आपण ! हो, पण डॉक्टरांना दिवाळीचे दोन्ही तिन्ही दिवस जेवायला यायचं आमंत्रण दिलं आहे ना तुम्हीं ?

**रमाकांत** : सन्तांना ना ? नाहीं. पण त्याची कांहीं एवढी घाई नाहीं. येतील ते रोजच्या वेळेला आज उद्यां, तेव्हां सांगेन.—चांगली मानाची जागा, नी भला मोठा पगार असला कीं, मोठी मजा वाटते, लता, नाहीं ? ( तिच्या कमरेभोंवतीं एका हातानें विळखा घालतो, इतक्यांत कुणीतरी दरवाजा ठोठावतें. दोघेहि एकदम बाजूला होतात. )

**रमाकांत** : कोण आहे ? काय त्रास आहे बुवा ! (पुढें जाऊन दरवाजा उघडतो. डॉक्टर संत आंत येतात. )

**रमाकांत** : या डॉक्टर ! तुमचीच गोष्ट चालली होती.

**डॉक्टर** : कुणीतरी बाई माणूस वर येतें आहे तुमच्याकडे.
( मुक्ता दरवाजांत येते व लतेला पाहून हंसत हंसत आंत पाऊल टाकते. )

**मुक्ता** : ( हंसत, पण भीत भीत ) लता !

**लता** : ( पुरी ओळख न पटल्यामुळें अडखळत ) कोण ? या आंत, बसा.

**मुक्ता** : हं, ओळखलंस नाहीं अजून तूं मला, लता !

**लता** : अं हं ! ( एकदम ओळख पटून ) कोण, मुक्ता ? होय—मुक्ताच ती ! ( पुढें जाऊन तिचे दोन्ही हात धरते व तिला पुढें ओढते.) मुक्ता ! मुक्ता ! गडे कित्ती फरक झाला आहे तुझ्यांत ! खरंच, मीं तुला ओळखलं नाहीं:—कित्ती दिवसांनीं, दिवसांनीं काय, —कित्ती वर्षांनीं मला भेटते आहेस तूं मुक्ता ! ये, बस ना. ( मुक्ता मनीबॅग, छत्री बाजूला ठेवते व दोघीहि कोचावर बसतात.)

**रमाकांत** : चला डॉक्टर, माझ्या खोलींत बसूं. (दोघेहि रमाकांताच्या

डाव्या बाजूच्या खोलींत जातात.

**लता :** मुक्ता, तूं बी. ए. झाल्यावर कॉलेज सोडून उमरावतीस गेलीस, त्यानंतर आपली भेटच झाली नाहीं, नाहीं ?

**मुक्ता :** तरी नऊ दहा वर्षें झालीं त्याला. तूं तेव्हां इंटर सायन्स-मध्यें होतीस, नाहीं ? तूं इंटर पास झालीस, नी कांहीं दिवसांनी तुझं लग्न झालं. होय ना ?

**लता :** खरंच कांग इतकीं वर्षें झालीं मुक्ता ?

**मुक्ता :** म्हणजे ? (गंभीर तोंड करून) लता, कमी का वर्षें झालीं ? जगाचा सर्व तऱ्हेचा अनुभव घेऊन मी म्हातारी सुद्धां झालें बघ !

**लता :** ( वाईट तोंड करून ) खरंच मुक्ता, तीन वर्षांपूर्वी तुझं हें असं झालं तें मला कळलं, पण तुझा पत्ता सुद्धां धड माहिती नव्हता मला ! किती खराब झाली आहेस तूं.

**मुक्ता :** (खिन्नपणें स्मित करीत ) मी म्हटलं ना लता, मी म्हातारी झालें म्हणून.

**लता :** थट्टा नाहीं, मुक्ता ! तुला मुलं बिलं कांहीं—

**मुक्ता :** मुलंहि नाहींत, नी बिलंहि नाहींत.

**लता :** किती निराशपणें बोलते आहेस तूं मुक्ता ! तीन वर्षं अशी दुःख करीत राहिली आहेस तूं ? ( कळवळ्यानें ) काय झालं असेल तुला मुक्ता ?

**मुक्ता :** कां ऽ ऽ हीं झालं नाहीं !

**लता :** ( आश्चर्यानें, तिच्या शब्दांवर मुळींच विश्वास न ठेवतां ) मुक्ता ! तरी आहे तूं बोलतेस तसं !

**मुक्ता :** ( खिन्नपणें स्मित करीत तिच्या केंसांवरून हात फिरवीत ) केव्हां केव्हां असतं शक्य तसं, लता !

**लता :** मग आतां मायेचं असं तुला अगदीं कुण्णी--कुण्णी नाहीं ? अगदीं एकटा जीव तुझा हा असा ? बाई बाई, कसं भयाण वाटत असेल तुला ! मुक्ता, मला दोन तीन मुलं आहेत; माझीं तिन्ही

बछडीं अगदीं छान गुटगुटीत आहेत ! खरंच, किती सुखांत वेळ जातो माझा ! बरं पण तुझ्याविषयीं अगदीं सगळं सगळं सांग मला गडे !

**मुक्ता** : ऐकण्यासारखं माझं काय आहे ? तुझ्याच सुखाच्या गोष्टी सांग मला.

**लता** : असं काय मुक्ता ? पण हो गडे, एक मोठी गम्मत तुला कळली का ग ?

**मुक्ता** : काय ?

**लता** : यांना आतां मॅनेजरची जागा मिळणार.

**मुक्ता** : खरंच कीं काय ? किती भाग्यवान् आहेस तूं !

**लता** : होय, खरंच, खरंच आहे मी मुक्ता– सुरवातीला हे बॅरिस्टरीची प्रॅक्टीस करीत होते, तेव्हां काय त्रास झाला आम्हांला ? आधीं काम मिळण्याकारितां कोण यातायात करावी लागे !– आणि त्यांत कसलं मेलं काम तें !– खऱ्याचं खोटं नी खोटयाचं खरं करायचं– इकडच्या स्वभावाला तर तसलं मुळींच आवडत नाहीं. आणि मलाहि बाई नाहीं पसंत तें !– मग एकदांची ही मिळाली कंपनींत तीनशें रुपयांची जागा– अन् आतां मॅनेजर, म्हणजे किती पगार मिळणार, आहे ठाऊक तुला ? साडे सातशें रुपये !– बाई, बाई ! साडे सातशें म्हणजे कित्ती पैसे, नाहीं ग ? पैसेच पैसे !– आतां किती मजेंत रहातां येईल नाहीं ? अगदीं कसली– कसली आतां काळजी नको आम्हांला.

**मुक्ता** : बरोबर आहे एका दृष्टीनं तुझं ! तुझ्या मनांत येईल तें तूं आतां घेशील.

**लता** : तें घेणं राहूं दे ग ! पण पैसा किती हातांत ? पैसाच पैसा.

**मुक्ता** : ( हंसत ) लता, अगदीं कॉलेजांत होतीस, तशीच तूं अजून आहेस. काय पैसे उधळीत होतीस तूं त्या वेळीं ?

**लता** : ( मोठ्यानें हंसत ) अगदीं इकडे जें नेहमीं म्हणतात, तेंच

तूं म्हणालीस. ( तिच्या समोर बोट हलवीत ) पण बाईसाहेब, तुम्हांला वाटते तितकी लता अगदींच अक्कलशून्य नाहीं हं ! पैसे उधळण्यासारखी स्थिति नव्हती आमची इतकीं वर्षं. आम्हांला दोघांनाहि मरेमरेतों काम करावं लागे.

**मुक्ता** : काय दोघांनाहि ? तूं ग कसलं काम करीत होतीस ?

**लता** : हळूं बोल गडे. यांना न कळत करीत होतें मी. त्यांना मुळींच आवडलं नसतं तें. कशिदा नी विणकाम मला किती छान करतां येतं—माहीत आहे ना तुला ? माझी एक पार्शी मैत्रीण चांगलीं भारी भारी कामं आणून देत असे मला ! करणार काय मुक्ता ?— हे तरी तेव्हां काय जिवाची आटापीट करीत असत ! इतकाऽऽ जिवाला त्रास करवून घेतला, कीं शेवटीं भयंकर दुखणं होऊन पडले ना ग ! आणि डॉक्टर तर म्हणायला लागले कीं, महाबळेश्वर नाहीं तर पांचगणीला जाऊन दोन तीन महिने तरी राह्यला पाहिजे, नाहीं तर धडगत—

**मुक्ता** : मग गेलांत ना तुम्हीं ?

**लता** : हो. गेलों खरीं, पण महाबळेश्वराला जाऊन राहाणं म्हणजे कांहीं खायचीं कामं नव्हतीं ! त्यांत आणखीन् माझं विजूच्या वेळचं बाळंतपण त्याच वेळेला आलं. सारा पंधरा दिवसांचा होता विजू माझा तेव्हां, आणि पैशांची तर कोण ताणाताण ? महाबळे-श्वरास जायचं नी चार महिने राह्यचं, म्हणजे हजार रुपये तरी पाहिजे होते.— हजार म्हणजे थोडे का ग ?

**मुक्ता** : थोडे नसले तरी तशा प्रसंगीं कसंहि करून पैसे हे उभे केले पाहिजेतच ना ?

**लता** : हो. मग केलेच उभे मीं. बाबांकडून मागवले पैसे ! बाबा त्या वेळेला अगदीं अंथरुणाला खिळले होते, अन् त्यांतच शेवटीं त्यांचा अंत झाला. मला त्यांना बघायलाहि जातां आलं नाहीं शेवटीं. हे इकडे दुखण्यानें पडलेले, मला तर नववा

महिना लागला होता. काय नी काय, अगदीं सर्व बाजूंनीं घेरलों होतों आम्ही तेव्हां.

**मुक्ता :** मग महाबळेश्वरास केव्हां गेलांत शेवटीं ?

**लता :** तशींच आणखीन् पंधरा दिवसांनीं गेलों. किती बरं झालं पण गेलों तीं ! हे अगदीं पहिल्यासारखे होऊन परत आले. पहिल्यासारखे काय पहिल्यापेक्षांहि—

**मुक्ता :** मग, मघाशीं ते डॉक्टर—

**लता :** ( हंसत ) ते होय ? ते डॉक्टर संत, ते आमचे मोठे स्नेही आहेत. इकडच्या घराण्याचा आणि त्यांचा अगदीं यांच्या वडिलांपासूनचा घरोबा. माझ्याहि बाबांची आणि त्यांची फार ओळख. तुला काय वाटलं ? यांना तपासायला आलेत ते होय ? महाबळेश्वराहून आल्यापासून अगदीं आनंदांत आहोंत आम्ही गडे, अगदीं सुखांत, अगदीं आनंदांत.—झालं ! पुन्हां आपलंच मीं पुराण चालू केलं ! मुक्ता, तुझ्याविषयीं अगदीं कांहींच सांगत नाहींस तूं ! तुझं असं झाल्यावर काय झालं असेल तुला ?

**मुक्ता :** ( खिन्नपणें ) म्हटलें ना मी तुला एकदां, कीं कां ऽ ऽ हीं झालं नाहीं म्हणून ?

**लता :** म्हणतेस काय तूं मुक्ता ? तुझ्या पतीवर तुझं मुळींच प्रेम नव्हतं का ? तो प्राणी तुला मुळींच आवडत नव्हता, तर लग्न तरी कशाला केलंस त्याच्याबरोबर ? लग्नापूर्वी तुला पूर्ण माहिती होती त्याची ?

**मुक्ता :** सगळींच लग्नं कांहीं प्रेमासाठीं होत नाहींत, लता ! माझी अपंग म्हातारी आई, आणि दोन पोरकीं भावंडं माझ्या अंगावर पडलीं होतीं हें विसरतेस तूं ! अंसल श्रीमंत स्थळ नाकारणं शक्य नव्हतं मला तेव्हां, नाइलाज होता माझा.

**लता :** खरंच, तुझंहि म्हणणं बरोबर आहे.

**मुक्ता :** ( उदासपणें वर पहात ) बरोबर आहे कीं बरोबर नाहीं

कुणाला ठाऊक ! केलं खरं तसं ! पण त्याचा तरी उपयोग काय झाला ? थोडयाच दिवसांत तिकडून पैसे घालवणं झालं—रहातं घरहि विकावं लागलं, आणि आम्ही सर्वच कफल्लक झालों ! पुढें मी मुलींच्या शाळेंत नोकरी धरली, आणि काल-परवांपर्यंत चालवली होती ती जीव मारून टाकणारी हमाली ! दिवसभर मुलींसमोर पोपटपंची करायची, मग घरीं यायचं नी भात उकडून खायचा; झोंपून उठायचं नी परत दुसऱ्या दिवशीं तीच पोपटपंची ! असं हें गेलीं कित्येक वर्षं चाललं होतं माझं ! अगदीं कंटाळून गेलें होतें मी त्या नोकरीला अन् त्या उमरावतीला. आई मेली, भाऊ कर्ते सवरते होऊन आफ्रिकेला नोकरीला निघून गेले. आणि मी एकटी भुतासारखी राहिलें होतें. शेवटीं भांडण होऊन तीहि नोकरी गेली. एका अर्थी बरं :वाटलं मला ! सुटलें एकदां असं झालं. म्हटलं जावं मुंबईला नी पहावं दुसरं कांहीं तरी काम. मुंबईत निदान आपल्या मैत्रिणी तरी आहेत बऱ्याच. केव्हां केव्हां त्यांचा सहवास मिळून, जिवाला जरा मोकळं तरी वाटेल.

लता : इकडे आली नाहींस तोंच काम पहाण्याच्या कसल्या गोष्टी करतेस, मुक्ता ? विश्रांति तरी घे कांहीं दिवस !

**मुक्ता** : ( उठून अस्वस्थपणें इकडे तिकडे फिरते ) विश्रांति—नको ग बाई ती भयंकर विश्रांति ! लता, आपलं स्वस्थ पडून रहायचं आणि मग हजार विचार डोक्यांत येऊन बेजार व्हायचं !—छे—छे, विश्रांति अशी मला मुळीच नको. काम—काम, मला सारखं कांहीं तरी काम पाहिजे. म्हणजे चांगलं मन गुंतून राहातं. मिळेल का ग कांहीं काम मला इथें कुठें तरी ?

लता : सारा जन्म काम करून थकून गेली आहेस तूं, मुक्ता; चार दिवस कुठें तरी चांगल्या हवेच्या ठिकाणीं जा.

**मुक्ता** : ( भिंतीवरच्या एका तसबिरीकडे पहात ) अन् खर्चासाठीं हजार रुपये द्यायला वडील कुठून आणूं ?

लता : ( उठून तिच्या जवळ जाते व तिच्या खांद्यावर हात ठेवून )

रागावलीस वाटतं, मुक्ता ? थट्टा नाहीं केली मीं.

मुक्ता : ( एकदम वळून प्रेमळ स्वरांत ) नाहीं ग लता, तुझ्यावर कशाला रागावूं ? तूंच माझ्यावर उलट रागावलं पाहिजेस. जगाच्या टोकरा खाऊन माझ्यासारख्या माणसांचीं अंतःकरणं कडू जहर झालेलीं असतात, आणि आम्ही वाटेल तसं कडू बोलतों ! क्षमा कर मला, लता. आम्ही कामं करतों त्यांत सुद्धां आम्हांला मजा वाटत नाहीं. स्वतःचा जीव जगवावयाचा म्हणून काम करण्यांत कसली मेली मजा ? कुणासाठीं तरी—कुणा तरी आपल्या जिव्हाळ्याच्या माणसासाठीं रात्रंदिवस जरी खपावं लागलं, तरी त्यांत जो आनंद आणि उत्साह वाटतो, तो असल्या कामांत वाटतो का ग कधीं ?—पण कामाशिवाय रहाणं मात्र शक्य नसतं. म्हणूनच, लता, तूं जेव्हां तुझे पति मोटे अंमलदार होणार म्हणालीस, तेव्हां तुझं भाग्य बघून मला आनंद झालाच, पण त्याहिपेक्षां माझी कांहीं तरी सोय होईल, या आशेनें अधिकच आनंद झाला !

लता : म्हणजे ? हं समजलें—यांना आपल्या एवढ्या मोठ्या ऑफिसांत, तुला एखादं काम देतां येईल असंच ना ?

मुक्ता : देतील कां ग मला एखादी जागा रमाकांत ?

लता : अलबत् ! दिलीच पाहिजे त्यांनी. माझ्याकडे लागलं तें ! बघ कशी युक्तीनें विषय काढीन मी त्यांच्याजवळ !— हं, असं करून, तसं करून, स्वारीला अगदीं खुषींत आणीन, आणि मग अगदीं हळूंच गळ घालीन !—तुझं काम झालंच पाहिजे. तुझ्यासाठीं मी एवढं केलं तर मलाहि त्यात आनंद होईल मुक्ता !

मुक्ता : किती गोड स्वभावाची मुलगी आहेस तूं लता ! संसारांतल्या नाना चिंतांची नी टक्क्याटोणप्यांची तुला कल्पनाहि नाहीं, तरी तूं जर इतक्या हळव्या मनाची, तर—

लता : काय ? संसारांतल्या चिंतांची नि टक्क्याटोणप्यांची मला कल्पनाही नाहीं ?

मुक्ता : ( स्मित करीत ) चिंता नी टक्केटोणपे म्हणजे आज भाजी

कसली करावी, नी उद्यां आमटीला काय भिजत घालावं असल्या गोष्टी नव्हेत गडे ! पोर आहेस तूं अजून लता !

**लता** : ( रागानें मान उडवते आणि तिकडून दुसरीकडे जाते ) मुक्ता, अगदीं अनुभवी आजीबाईसारखा मोठेपणाचा आव आणूं नकोस माझ्यापुढें.

**मुक्ता** : तसं नव्हे लता–

**लता** : तूंच काय–सर्वांना तसंच वाटतं. त्यांना वाटतं कीं माझ्या हातून महत्त्वाची नी जबाबदारीची अशी कांहीं गोष्ट होणं शक्यच नाहीं.

**मुक्ता** : लता !

**लता** : हो हो, जसा कांहीं या चिंतापूर्ण जगाचा मला अनुभवच नाहीं.

**मुक्ता** : अग पण तुझ्यावर आलेला प्रसंग नी तुझ्या चिंता आतां-पर्यंत मला सर्व सांगितल्यास त्याच ना ?

**लता** : उंः, सांगितलं तें कांहींच नाहीं ? (हलका आवाज करून) एक मोठं–फार मोठं आणि नाजूक काम मीं केलं, तें तुला सांगितलंच नाहीं.

**मुक्ता** : काय बरं तें मोठं नाजुक काम ?

**लता** : तुला माझ्या हातून अगदीं कांहींच मोठं होणार नाहीं असं वाटतं ना, मुक्ता ?–पण तुला एकदां सांगितलं, मग कळेल मी काय करूं शकतें तें ? आपल्या आईसाठीं नी भावंडांसाठीं आपण रात्रंदिवस खपलें, याचा तुला मोठा अभिमान आणि आनंद वाटतो, होय ना ?

**मुक्ता** : होय, खरंच वाटतो. आईहि सुखानें मेली, आणि माझे भाऊहि चांगले कर्तेसवरते होऊन उदयाला आले.

**लता** : आणि त्यांच्यासाठीं तूं कांहीं तरी केलंस, याचा तुला मोठा अभिमान वाटतो ?

**मुक्ता** : वाटणारच मला !

**लता** : बरोबर आहे तुझं.—मलाहि अभिमान नी आनंद वाटावा असं मीं केलं आहे कांहीं तरी !

**मुक्ता** : केलं असशील तूं. पण कशासंबंधीं बोलते आहेस तूं ? लक्षांत नाहीं आलं माझ्या.

**लता** : हळूं बोल ! हळूं बोल ! तिकडनं ऐकलं तर !—त्यांना अगदीं अगदीं समजतां कामा नये. अगदीं जगांत कुणालाच कळतां कामा नये ! तुला मात्र सांगणार मी.

**मुक्ता** : अग पण, काय तें ?

**लता** : ये इकडे. ( पुन्हां तिला कोचावर नेऊन बसवते व स्वतः तिच्या शेजारीं बसते.) आतां सांगतें मी तुला, कीं मलाहि अभिमान नी आनंद वाटण्यासारखी गोष्ट मीं केली कीं नाहीं ती ! इकडचा प्राण मीं वांचविला.

**मुक्ता** : काय ? रमाकांतांचा प्राण तूं ऽ वांचवलास ? कसा ?

**लता** : मीं तुला सांगितलं नाहीं कां का, डॉक्टर म्हणाले होते कीं, महाबळेश्वरास गेलं नाहीं तर धडगत नाहीं म्हणून ? आणि आमच्याकडे तर शिलकेच्या नांवानं पूज्य होतं !

**मुक्ता** : हांय, पण तुला तुझ्या वडिलांनीं पैसे दिले ना ?

**लता** : ( हंसून ) होय ! तशी यांची समजूत आहे, आणि बाकी सर्व जगालाहि तसंच वाटतं ! पण—

**मुक्ता** : पण काय ?

**लता** : पण बाबाकडनं एक कवडीही मिळाली नव्हती ! मीं ऽ उभे केले ते सर्व पैसे !

**मुक्ता** : काय एवढी मोठी रक्कम तूं —?

**लता** : हो हो, हजार-रोख हजार रुपये.

**मुक्ता** : पण लता, एवढे पैसे आणलेस कुठून तूं ! तुला लॉटरींत पैसे मिळाले कीं काय ?

**लता** : ( तुच्छतेनें हंसून ) लॉटरी तर ! --मग त्यांत कसली माझी मोठी हुशारी ?

मुक्ता : मग तूं आणलेस तरी कुठून ?

लता : [ मोठा गूढपणाचा आव आणून स्वतःशींच हासते व डुलते] हुं: हुं:, तीच तर खुबी !

मुक्ता : तूं कुणाकडून कर्जाऊ पैसे घेणं तर शक्यच नाहीं.

लता : कां ? कां ?--कां नाहीं ?

मुक्ता : छे छे, छे छे. लता, नवऱ्याला सांगितल्याशिवाय असले धंदे करणं कुठल्याहि बायकोला शक्य नाहीं. बरं नाहीं हें बायकांना !

लता : [ मान उडवून ] पण एखाद्या बायकोला असले व्यवहार करण्याचं जरा डोकं असलं--तिच्या अंगांत जर एवढी हुशारी असली--

मुक्ता : लता, तुझ्या बोलण्याचा कांहीं अर्थच समजत नाहीं मला.

लता : कशाला समजायला पाहिजे तुला ? म्हटलं कधीं मीं कर्जाऊ पैसे घेतले म्हणून ?--दुसरी कांहीं तरी युक्ति केली असेन मी ! [ कोचाला टेकून कोचाच्या पाठीवर डोकें टाकते.] अग, माझ्या-सारख्या हुशार मुलीला हजार युक्त्या सुचतात.

मुक्ता ' वेडी आहेस तूं, लता.

लता : (हंसत) हं हं. मुक्ता, समजलं हं ! इकडे तर कोऽऽण उत्कंठा लागून राहिली आहे तुला, मीं काय केलं तें समजावयाची; नि म्हणे वेडी आहेस तूं !

मुक्ता : ( गंभीरपणें ) लता, नवऱ्याला न कळत असल्या गोष्टी करणं बरं नाहीं गडे !

लता : ( सरळ ताठ बसून ) आपल्या पतीचे प्राण वांचवणं बरं नाहीं वाटतं, मुक्ता ?

मुक्ता : पण, लता, पतीला न कळत--

लता : अग पण त्यांना न कळत सगळें केल्याशिवाय गत्यंतर नव्हतं मुळीं ! कसं समजत नाहीं, मुक्ता, तुला अगदीं ? त्यांचं दुखणं फार कठीण आहे हें त्यांना कळूं द्यायचं नव्हतं. डॉक्टरांनीं मला गुपचुप सांगितलं कीं, महाबळेश्वरासारख्या ठिकाणीं गेल्याशिवाय धडगत नाहीं म्हणून ! बरं, त्यांचं मन वळवण्याचा एक तरी उपाय

शिल्लक ठेवला का मीं ? रडलें—रुसलें—आळवण्या केल्या—पण छे; मला महाबळेश्वरास एकदां नेईन असं कधीं पूर्वी म्हटलं होतं, त्याची आठवण केली, नी मला आतांच फार फार जावंसं वाटतं कुठं तरी तसल्या ठिकाणीं, असा हट्ट धरून बसलें; मी बाळंतीण असतांना तशा स्थितींत माझं तेवढंसुद्धां ऐकायचं नाहीं ना—म्हणून फुरगटून राह्यलें—कर्ज काढलं तर काय झालं मोठं, असं रडत रडत सुचाविलंही !—अगबाई, काय चिडायचं झालं तेव्हां !—म्हणाले आपल्याकडे पैसा नाहीं, नि कर्जबाजारीपणा करून जगण्यापेक्षां मेलेलं पत्करलं !—भलताच हट्ट धरूं नको म्हणून सांगितलं मला—मग रहावेना माझ्यानं !—कसंहि करून, म्हटलं नेलंच पाहिजे महाबळेश्वरास आणि म्हणून मग मीं युक्ति काढली ती.

**मुक्ता** : अग, पण तुझ्या वडिलांशीं पुढें कधीं बोलतांना ध्यानांत आलं नाहीं रमाकांतांच्या कांहीं सुद्धां ?

**लता** : बोलायला जगले कुठें बाबा त्यानंतर ? तेव्हांच नाहीं का ते गेले ? आणि असते बाबा तर सांगणार होतें मी सगळं बाबांना; आणि इकडे अगदीं कांहीं कळतां कामा नये म्हणून बजावणार होतें.

**मुक्ता** : आणि आजतागायत रमाकांतांना तुझं हें गुपित तूं मुळींच सांगितलं नाहींस ?

**लता** : काय, वेऽऽड लागलं आहे तुला मुक्ता ! इकडचा स्वभाव म्हणजे काय आहे, याची कल्पना तरी आहे तुला ? या बाबतींत फार—फारच बाई, कडक आहेत मतं इकडचीं ! इकडल्यासारख्या मानी स्वभावाला, आपल्या बायकोनें पैसे उभे करून आपला जीव वांचविला, ही मोठी लज्जेची नि कमीपणाची गोष्ट वाटेल. छे छे, मुळींच होतां कामा नये तसं ! आमच्या दोघांच्या प्रेमांत विष पडेल. तसं झालं तर—आमचा हा सुंदर, सुखाचा संसार मातीला मिळेल !

**मुक्ता** : तर मग हें कधींच सांगणार नाहींस तूं आपल्या नवऱ्याला ?

लता : (विचाराक्रांत मुद्रा करून किंचित् खिन्नपणें स्मित करीत) सांगेन—सांगेन, पुढें केव्हां मी म्हातारी दिसूं लागलें—माझं हें सर्व सौंदर्य लयाला गेलं, मग—हंसू नको मुक्ता ! खरंच—पुढें जेव्हां, माझ्यावर हल्लींइतकं इकडचं प्रेम रहाणार नाहीं, माझ्या नाचण्या-बागडण्याचा,—माझ्या गोड गोड गाण्यांचा इकडे जेव्हां कंटाळा येऊं लागेल, तेव्हां—तेव्हां इकडचं मन प्रसन्न करण्याकरितां, कांहीं तरी सांगण्यासारखं टेवलं पाहिजे ना आपल्याजवळ, गडे ?— ( एकदम मान उडवून ) इश्श ! काय बडबडतें आहे मी खुळ्या-सारखी ! तसा प्रसंग कधींच येणार नाहीं माझ्यावर !—काऽय ?— आहे कीं नाहीं माझं मोठ्ठं गुपित ? कां, अजूनसुद्धां वाटतं का तुला कीं, माझ्या हातून जबाबदारीचं कांहींच काम होणार नाहीं म्हणून ? अजूनहि पोरकटच वाटतें का मी ? आणि या भानगडीची दगदग कांहीं कमी होत नाहीं मला. दर सहा सहा महि-न्यांनीं ती रक्कम नि तें व्याज वेळच्यावेळीं भरायचं, म्हणजे खायचं काम नाहीं ! कोऽऽण ओढाताण करावी लागते मला जीवाची ! सावकारीचा धंदा म्हणे ! तें व्याज, अन् ते हप्ते ! नको ग बाई ! जीव अगदीं मेटाकुटीस येतो बाई ! कशी डोळ्यांत तेल घालून, प्रत्येक बाबतींत काटकसर करावी लागते मला ! इकडची नि मुलांची खाण्यापिण्यांत तर आबाळ होतां कामा नये ना ?—बरं, मुलांच्या कपड्यालत्त्यांत तरी किती काटकसर करायची ग ? मला नाहीं आवडत बाई, मुलांनीं कसले तरी कपडे घातलेले; आणि इकडे तर मुळींच नाहीं आवडायचं तें ! मला म्हणून दिलेल्या सर्व पैशांचा मी मुलांसाठीं खर्च करतें. कशीं गोड आहेत माझीं छबडीं, मुक्ता !

मुक्ता : स्वतःचा असा जीव मारून तूं संसार चालविला आहेस, लता ?

लता : माझा ग कसला जीव ? मीं केलं तें मला नको कां फेडायला ? लुगडीं नीं पातळं घ्यायला जेव्हां जेव्हां मला इकडनं पैसे देतात,

तेव्हां तेव्हां जेमतेम अर्धे पैसे खर्च करतें मी कपडयांसाठीं ! तरी बरं, मला आपले कसलेहि कपडे बरे दिसतात, आणि इकडच्या ध्यानांतही येत नाहीं केव्हां तें ! पण केव्हां केव्हां अगदीं नकोसं होतं मला. छान छान पातळं नेसायला मोठी मजा वाटते, नाहीं मुक्ता ?

**मुक्ता** : आणि तुला तर—

**लता** : तें मरूं दे. आणि पैसे जमविण्याच्या दुसऱ्याहि खटपटी खूप केल्या हं मी. त्या पार्शी मैत्रिणीविषयीं मघांशीं म्हटलं ना मी तुला ? तिनं कांहीं दिवसांपूर्वी एक लांबचलांब धारी झीग भरायला आणून दिलीन्; पैसे बरे मिळाले, पण काय दीड महिना डोळे-फोड करावी लागली रात्रंदिवस ! बरं, सगळा कारभार यांना चोरून करायचा. अगदीं थकून जात असें मी. पण पैसे जमविण्यासाठीं खूप काम करावं लागलं, तरी मजा वाटते मोठी ! बायकांचा दुबळेपणा जाऊन अगदीं धीट वाटतं पुरुषासारखं.

**मुक्ता** : मग, आतांपर्यंत फेडलेस किती तूं पैसे ?

**लता** : अगदीं बरोबर कांहीं हिशोब नाहीं माझ्याजवळ, पण बहुतेक फिटत आले असतील. हिशोब तरी ठेवणं कठीण आहे मोठं. सगळाच चोरटा कारभार ! पण अगदीं जिवाची आटापेट करूनसुद्धां हप्त्यापुरती रक्कम जमा करतांना केव्हां केव्हां नाकीं नऊ येत ! किती तरी वेळां वाटे कीं, मी खिडकींत बसलें आहें; समोर रस्त्यावरून, जवळ खूप पैसे असलेली आणि नात्यापात्याचें कुणीसुद्धां नसलेली, अशी एक श्रीमंत गुजराथी म्हातारी चालली आहे; पाठीमागून आलेल्या मोटारचा धक्का लागून एकदम तिला अपघात झाला, आणि धांवत धांवत पुढें जाऊन मोठ्या प्रयासानें मीं आणि भिमानं तिला आमच्या घरांत आणिली, आणि अगदीं मुलीसारखी तिची काळजी घेऊन सर्व डॉक्टरी उपचार केले. तरी शेवटीं—

**मुक्ता** : अग, पण कोण ती म्हातारी बाई ?

**लता** : थांब ग ! तरी शेवटीं ती मेलीच. पण मरतां मरतां तिनं

आपलं मृत्युपत्र केलं, आणि त्यांत लिहिलं कीं, माझी झाडून सर्व इस्टेट मिसेस लताबाई रमाकांत इच्या नांवें व्हावी.

**मुक्ता** : अग पण लता, कोण ती म्हातारी सांग ना मला ?

**लता** : अग म्हटलं ना मीं, मला आपलं असें वाटे म्हणून ! कुठची म्हातारी नी कुठला पैसा ! पैसे जमेचनासे झाले म्हणजे हैराण होऊन एकएक कल्पना करीत बसत असें मी, दुसरं काय ? पण जाऊं द्या तें सगळं आतां ! ती म्हातारीहि मरो, आणि तिचा पैसाहि जळो ! आतां मी अगदीं सुटणार पैशाच्या काळजींतून. ( एकदम उडी मारून उभी रहात ) मुक्ता ! गडे, अगदीं कां ऽ हीं काळजी नसली म्हणजे किती बरं वाटतं नाहीं ? उडावं, बागडावं, तासचे तास मुलांशीं हवं तितकं खेळत बसावं, नाहीं ? अगदीं इकडे आवडतील तसले कपडे करावे आणि घर पण कसं झोकांत ठेवावं— आतां पगार वाढला म्हणजे पुन्हां एकदां महाबळेश्वरास जाऊं आम्ही. अहाहा ! काय मजा वाटते तिकडे मुक्ता ! सकाळींच उठावं, तों धुकं पांघरलेल्या डोंगरांच्या लांबच्या लांब निळया सांवळ्या रांगा ! लांब जंगलांत फिरायला जावं, तिथं फुलपांखरांसारखीं दिसणारीं नाना रंगांचीं जंगलीं फुलं ! अहाहा ! अशा ठिकाणीं आपल्या मुलांमाणसांत सुखानं रहायचं.

( दार ठोकल्याचा आवाज येतो. )

**मुक्ता** : दार ठोकतंय कुणी तरी. ( उठून ) जातेंच मी आतां लता.

**लता** : बस ग, यांना भेटायला आलं असेल कुणीतरी.

( जाते व दरवाजा उघडते. )

**रामनाथ** : ( दरवाजांतूनच ) रमाकांत आहे घरांत ? ( मुक्ता त्याच्याकडे पहाते आणि एकदम दचकून, कांपत कांपत तोंड दुसरीकडे वळविते. )

**लता** : (घाबरलेल्या पण कृत्रिम जोराच्या आवाजांत) कोण तुम्हीं ? काय काम आहे आपलं ?

**रामनाथ** : कांहीं विशेष नाहीं. ऑफिसचं काम आहे. तुमचे पति

आतां आमचे मॅनेजरसाहेब होणार असं ऐकतों.

लता : होय, मग ?

रामनाथ : नाहीं नाहीं, तसं कांहीं नाहीं. आतां फक्त माझं ऑफिसचं काम आहे. तसं खाजगी कांहीं नाहीं.

लता : बसले आहेत ते आपल्या खोलींत. जा, जा तुम्हीं तिथं.

( रामनाथ सरळ रमाकांताच्या खोलींत जातो, दार लावून लता परत येते. )

मुक्ता : लता, कोण ग ते गृहस्थ ?

लता : आहे एक यांच्या ऑफिसांतला मनुष्य, रामनाथ त्याचं नांव.

मुक्ता : हं ! तेच ते तर मग.

लता : म्हणजे ? तुझ्या ओळखीचा आहे कीं काय तो ?

मुक्ता : ओ–ळ–खी-चे ! हो, कांहीं वर्षांपूर्वी होती त्यांची माझी ओळख, तेव्हां ते कुठच्याशा सॉलिसिटरच्या ऑफिसांत होते, मला वाटतं !

लता : हं.

मुक्ता : बराच फरक झालेला दिसतो त्यांच्यांत.

लता : मुलंहि बरींच आहेत म्हणे त्यांना. त्यांची बायको मेली आहे. तिचं आणि त्याचं कांहीं पटत नव्हतं मुळींच म्हणतात.

मुक्ता : असेल. हल्लीं बरं आहे ना त्यांचं ? मध्यें मीं ऐकलं होतं कीं, सावकारीचा कीं कांहीं व्यवहार करीत असत ते.

लता : सावकारीचा ! म्हणजे लोकांना पैसे कर्जाऊ वगैरे देण्याचा कुणाला ठाऊक बा ! ( एकदम ) जळो ते व्यवहार नी तीं कर्ज ! दुसरं कांहीं तरी बोलूं आपण चांगलं.

डॉ. संत : ( रमाकांताच्या खोलीच्या बाहेर येत ) नको नको. मी बसतों थोडा वेळ बाहेर लताबरोबर बोलत. तुम्ही करा आपलं काम. ( बाहेर येतात ). ( मुक्ताकडे बघून ) माफ करा हं. त्यांचं कांहीं ऑफिसचं काम आहे, म्हणून थोडा वेळ मी इथं बसतों.

लता : छे छे, डॉक्टर, इतकं औपचारिक व्हायला नको बरं कां ?

मुक्ता ती, माझी अगदीं जुनी मैत्रीण आहे. बसा तुम्ही.

**डॉक्टर** : ओ हो ! तुमचं नांव मीं या घरांत पुष्कळ वेळां ऐकलं आहे. मघाशीं मी आलों, तेव्हां माझ्या मागोमागच तुम्ही येत होतां, नाहीं ?

**मुक्ता** : हं, चढतांना फार त्रास होतो मला.

**डॉक्टर** : कां ? वीक् हार्ट ?

**मुक्ता** : तसं कांहा नाहीं, पण अतिश्रमामुळें थकवा आल्यासारखं होतं अलिकडे मला.

**डॉक्टर** : अं, एवढंच ना ? मग मुंबईला थोडे दिवस विश्रांति घ्यायला आलां आहांत वाटतं ?

**मुक्ता** : कांहीं काम इथं मिळतं का पाहयला आलें आहे.

**मुक्ता** : अतिश्रमावर हा उपाय वाटतं ?

**मुक्ता** : कांहीं तरी करून जगलं पाहिजे, डॉक्टर !

**डॉक्टर** : खरं आहे. जगांतल्या बऱ्याच लोकांचं मत असं आहे खरं.

**लता** : आणि डॉक्टर तुम्हांलाहि नाहीं कां जगावसं वाटत ?

**डॉक्टर** : वाटतं, खात्रीनं वाटतं ! माझ्या यातना अगदीं असह्य झाल्या, तरी शक्य तितके जास्त दिवस कंठावे असंच वाटतं मला. माझीच गोष्ट कशाला ! माझ्या सर्व पेशंट्स्चंहि तसंच ! शरीराला रोग झाले त्यांचंच नव्हे, तर ज्यांचीं मनंहि किडलीं आहेत त्यांचंहि तसंच. अशीच एक केस–म्हणजे ज्याचा नैतिक किडकेपणा अगदीं शेवटच्या थराला पोंचला आहे, असा एक मनुष्य या क्षणाला रमाकांताबरोबर बोलत बसला आहे.

**मुक्ता** : ( उदासपणें ) अं ?

**लता** : म्हणजे ? कोण ?–

**डॉक्टर** : तुला नाहीं माहीत तो. रामनाथ नांवाचा त्यांच्या ऑफिसांतला एक माणूस आहे. त्याचं दुखणं शरीराचं नाहीं. त्याचं शील सडून गेलं आहे. पण तो सुद्धां अगदीं आवेशानें हेंच बोलतो आहे कीं, आपण या जगांत जगणं हें अगदीं फार फार महत्त्वाचं आहे.

**लता** : असं ? त्यांच्याशीं कशासंबंधानें बोलतो आहे तो ?

**डॉक्टर** : मला कांहीं कल्पना नाहीं. पण कंपनींतल्या त्याच्या नौकरीसंबंधीं कांहीं आहे.

**लता** : मला नाहीं माहीत कांहीं–काय त्यांचं नांव म्हणालांत ? रामनाथ ना ? त्यांचं काय नोकरीचं ?

**डॉक्टर** : आहे कांहीं सेक्रेटरीची कीं काय त्याला जागा तिथें. ( मुक्ताकडे वळून ) तुम्हांला अशीं कांहीं माणसं माहीत आहेत कांहो ? कीं ज्यांचा उद्योगच हा, कुठून ना कुठून तरी हलक्या नीतिमत्तेचीं माणसं शोधून काढायचीं आणि मग त्यांना चांगली लठ्ठ पगाराची जागा आपल्या हाताखालीं द्यायची. कां ? तर म्हणे, मग त्यांच्यावर आपणाला नेहमीं प्रत्यक्ष नजर ठेवतां येते, आणि त्यांना संभाळून घेतां येतं. अशामुळें होतं काय, कीं उत्तम चारित्र्याचीं माणसं मात्र भुके मरतात.

**मुक्ता** : पण मला वाटतं, हलक्या नीतिमत्तेचीं–हलक्या नीतिमत्तेचीं माणसं म्हणून ज्यांना आपण म्हणतों, त्यांनाच संभाळून घ्यायची खरी आवश्यकता असते.

**डॉक्टर** : पहा, तुमचंहि तेंच मत. हीं मतं हल्लीं फार बोकाळलीं आहेत आमच्या समाजांत–

( लता इतका वेळ आपल्याच विचारांत चूर झालेली असते, ती एकदम हंसते व टाळ्या वाजवते. )

**डॉक्टर** : हें काय ? हंसतेस काय ? समाज म्हणजे काय आहे, याची तुला कल्पना तरी आहे ?

**लता** : कोण त्या तुमच्या समाजाची पर्वा करतं आहे ! मी दुसऱ्याच कशाकरतां हंसते आहें. दुसरीच एक कांहीं गंमत आहे– डॉक्टर, यांच्या कंपनींतल्या एकूण एक सर्व लोकांना आतां अगदीं यांच्याच हुकमतीखालीं रहावं लागणार, होय ना ?

**डॉक्टर** : याचीच तुला इतकी गम्मत वाटली कीं काय ?

**लता** : तुम्हांला काय करायचं आहे त्याच्याशीं ?

( दिवाणखान्यांत इकडे तिकडे फिरते. )

**लता :** यांच्या हातांत इतकी सत्ता येणार, म्हणजे मोठी मौज होणार, नाहीं ? डॉक्टर, कांहीं बोरंबिरं पाहिजेत ? ( ओटींतून अमदाबादी बोरं काढते. )

**डॉक्टर :** काय बोरं ? मला वाटतं या घरांत त्यांना सक्त मनाई आहे !

**लता :** होय. पण मुक्तानं आणलीं आहेत हीं थोडीशीं येतांना–

**मुक्ता :** काय मी ?

**लता :** हो ग. इतकी घाबरून काय जातेस ? तुला काय माहीत आमच्या घरांत बोरं चालत नाहींत तीं ! यांना वाटतं मीं बोरं खाल्लीं तर माझे दांत खराब होतील म्हणून. पण काय ग–एकदां कधी तरी खाल्लीं थोडीं तर काय झालं ? डॉक्टर, होय कीं नाहीं ? आणि स्वतः डॉक्टरच खाणार असल्यावर मग तर कांहींच हरकत नाहीं ! हें घ्या तुम्हांला एक. ( एक डॉक्टरना देत ) मुक्ता, तूं सुद्धां खाल्लं पाहिजेस. मी एखादंच खाईन लहानसं, एक, फार तर दोन. ( इकडे तिकडे फिरते. ) आज मला अगदीं आनंदांत उड्या मारावंसं वाटतं आहे ! आणि एक अगदीं फार मोठी–फाऽऽर मोठी गोष्ट आहे, ती अगदीं मोठ्ठ्यानें बोलून टाकावी असं कित्ती कित्ती वाटतं आहे मला !

**डॉक्टर :** काय तें ? बोल ना !

**लता :** यांना अगदीं ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें ती बोलावी असं वाटतं आहे–

**डॉक्टर :** मग बोलत कां नाहींस ?

**लता :** नाहीं. धीर नाहीं होणार मला. ऐकल्यावर धक्काच बसेल अशी गोष्ट आहे ती.

**मुक्ता :** काय ? धक्का बसण्यासारखी !

**डॉक्टर :** मग ऐक तर माझं. नको बोलूंस ती. पण आमच्यासमोर बोलायला कांहीं हरकत नाहीं. काय तें एवढं मोठं कीं, जें अगदीं

रमाकांताच्या कानांवर जाईल इतक्या मोठ्यानें बोलणार आहेस तूं ?

लता : किती किती सांगावीशी वाटते आहे मला ती—पण नकोच बाई !

डॉक्टर : तुला काय वेड लागलं आहे कीं काय ?

मुक्ता : गडे लता—

डॉक्टर : हा आलाच रमाकांत. बोल आतां.

लता : ( चटकन् बोरें ओटींत लपवीत, तोंडावर बोट ठेवून ). शू : शू : ( रमाकांत खोलीच्या बाहेर येतो. त्यानें आतां नेकटाय बांधला आहे व कोट घातलेला आहे. हातांत काठी व हॅट आहे. )

रमाकांत : लता ! ( दोघीहि उठून उभ्या राहतात ) मी जरा जिमखान्यावर जाऊन येतों. चला डॉक्टर.

लता : ( मुक्ताकडे वळून बघत ) ही ओळखलीत का कोण ती ?

रमाकांत : कोण ? नाहीं बुवा !

लता : 'मुक्ता' 'मुक्ता'—म्हणून मी नेहमी गोष्टी सांगतें, ती हीच हो.

रमाकांत : आणि मघाशीं त्यांना ओळखलंस सुद्धां नाहींस तूं पहिल्यांदा !

लता : पण किती वर्षांनीं भेटते आहे ही मला, माहीत आहे तुम्हांला ? खरंच, मोठी गंमत झाली, मीं ओळखलं नाहीं हिला तेव्हां ! काय लाजलें मी मग !—पण ही एवढी आपल्या इथं कशाला आली आहे ठाऊक आहे का ? तुम्ही मोठ्या प्रख्यात कंपनीचे मॅनेजर होणार हें कळलं तिला, तेव्हां—

रमाकांत : म्हणजे ?—

मुक्ता : लता, भलतंच काय—

लता : गप्प बस ग तूं !—तेव्हां मुद्दाम आली आहे ती इथें. तिला नोकरी पाहिजे आहे एखादी छानशी, मॅनेजरसाहेब !

रमाकांत : ( हंसत ) खरंच, ( मुक्ताकडे पहातो ) सेक्रेटरीचं काम करितां येईल तुम्हांला ?

**लता** : म्हणजे ? मुक्ता म्हणजे कांहीं अशी तशी आहे वाटतं ? इकॉनॉमिक्स ऑनर्स घेऊन, बी. ए. होणारी पहिलीच मुलगी होती ती आमच्या कॉलेजांत ! इंटरमध्यें हुगलिंग प्राईज मिळालं होतं तिला !

**रमाकांत** : मग मिळेल कीं काम त्यांना आमच्या ऑफिसांत !

**लता** : ( आनंदानें टाळ्या वाजवीत ) पाहिलंस मुक्ता ? सांगितलं होतं की नाही मी तुला—बोल, सांगितलं होतं कीं नाहीं ?

**रमाकांत** : तुम्ही अगदी वेळेवर आलांत मुक्ताबाई !

**मुक्ता** : किती उपकार आहेत तुमचे माझ्यावर.

**रमाकांत** : छे छे, उपकार कसले त्यांत ! एका माणसाला मी काढणार होतों, ती जागा होणारच होती रिकामी. बरं लता, जातों तर मी !

**लता** : उशीर करूं नका हं फार !

**रमाकांत** : हं हं. ( डॉक्टर व रमाकांत जातात. )

**मुक्ता** : लता, काय ग बाई धांदल तुझी !

**लता** : पण झालं कीं नाहीं काम, बोल ?

**मुक्ता** : ( घड्याळाकडे बघत ) अग बाई, बराच उशीर झाला, जातें मी आतां.

**लता** : थांब ग. चहा तरी घेऊन जा. मुलं सुद्धां येतील आतां. भिमा, भिमा !

( 'जी आलें' म्हणत भीमा उजव्या बाजूच्या खोलींतून येते. )

**लता** : बाईना दोन पेले चहा करायला सांग लवकर, नि घेऊन ये इथें लगेच. जा. ( ती जाते. )

( *दिवाणखान्याचा दरवाजा धाडकन् उघडून ओरडत ओरडत, नाचत-बागडत मुलें आंत येतात. त्यांच्या पाठोपाठ बाया आंत येते. लता आणि मुक्ता एकदम उठून दरवाजाकडे बघतात. विजू व मन्या आईकडे धांवतात. कमाला बायानें घेतली आहे. बायाच्या*

हातांत मुलांची खेळायची रंगीत बादली व खेळांतलें एक लांकडी पावडें आहे.)

**लता** : आलांत फिरून ? आज अगदीं खूप धिंगा केलेला दिसतो आहे. बायाआजीचा जीव काढला असाल. होय ना बाया ?

**बाया** : छे, छे बाई, अगदीं इलाज नाहीं यांच्यापुढें.

**लता** : मुक्ता, कशीं आहेत माझीं छबडीं ?

**मुक्ता** : भाग्य आहे तुझं लता ! ( मन्याला उचलून घेते व त्याच्या गालाला हात लावून ) ओळखतोस का रे मला ! कोण बरं मी ?

**लता** : आपली मुक्तामावशी बरं कां ही !(बायाकडे वळून) कमाला दे माझ्याकडे बाया, आणि जा तूं, बस स्वस्थ; मी काढतें त्यांचे कपडेबिपडे. ( कमाला बायाकडून घेते. बाया उजव्या बाजूच्या खोलींत जाते. कमाचे मुके घेत. ) माझी बाहुली पाहिलीस का मुक्ता, कशी आहे ? ( भिमा दोन पेले चहा घेऊन येते व एक टीपॉय कोचापुढें ओढून त्यावर दोन्ही पेले ठेवते. ) भिमा, बाहेर जिन्यावरचा दिवा लाव लवकर, जा !

**भिमा** : हां, बाई. ( जाते. )

**लता** : चहा घे ग मुक्ता !

**मुक्ता** : तूं ये ना !

( कमाला घेऊन लता कोचाकडे येते. नंतर दोघीहि कोचावर बसतात, व हळू हळू चहा पितात. विजू आणि मन्या दिवाणखानाभर दंगा करतात, आईकडे येतात आणि आपापल्या खेळाच्या गोष्टी सांगतात. मधून मधून लता त्यांच्याशीं बोलते व 'असं करूं नको,' 'तसं करूं नको,' म्हणून त्यांच्यावर ओरडते. चहा पिऊन होतो व भिमा चहाचे कप घेऊन जाते. )

**मुक्ता** : अगबाई, किती काळोख झाला हा ! लता, आतां येतें मी. ( आपली बॅग व छत्री घेऊं लागते. )

**लता** : बरोबर कोणी देऊं का ग ?

मुक्ता : नको, कशाला पाहिजे बरोबर ! ही इथें उतरली आहे मी जवळच बाळूताईच्या घरीं.

लता : पुन्हां किती वर्षानं येशील आतां ? तें कांहीं नाहीं चालायचं ! आतां दररोज आलं पाहिजेस हं मुक्ता !
मुक्ता : अगदीं दररोज. तूंच 'नको' म्हणशील शेवटीं ! बरं येतें. ( जाते. लता परत आंत येते. )

लता : ( मुलांना ) अरे, कांहीं कपडे बिपडे बदलायचे आहेत कीं नाहींत ? काय दांडगाई ही ! बाहेरच्याच कपड्यांनीं मस्ती चालविलीत पुन्हां. इकडे या बघूं. या. ( मुलं जवळ येतात. लता पहिल्यांदा त्यांचे बूट काढते. मग हळू हळू बाहेरचे कपडे उतरते. कपडे उतरणें चालू असतांना, विजू आणि मन्या दोघेहि आपापल्या गोष्टी एकदम सांगतात. लताहि लाडिकपणें दोघांशीं बोलते.)

लता : अं अस्सं ! मोठा—अगदीं मोठा वाघाएवढा मोठा कुत्रा आला तुमच्याकडे ? मग ? एकदम ओरडलास त्याच्या अंगावर विजू ? वा—मग जीव घेऊन पळाला तो होय ना ?—आणि मन्या घाबरून बायाआजीला चिकटला असेल, होय ना ? काय नाहीं ? मन्या पण तुझ्याबरोबर काठी घेऊन ओरडत होता ? अरे वा ! तुम्ही दोघेहि अगदीं शूर आहां हं.—कमा रडली होय ? मुलगीच ती ! रडणारच ! ( कपडे उतरून होतात. साध्या कपड्यांत मुलें उड्या मारूं लागतात. ) हं, आतां मस्ती करायची नाहीं हं. उद्यां विजूचा वाढदिवस आहे, होय ना ? काय सुरेख सुरेख आणलं आहे मी बाजारांतून ! छे रे बाबा ! आतां नाहीं सांगायचं काय तें—मस्ती नाहीं केली तर उद्यां दिसेल सगळं. विजूसाठीं काय आणलं आहे ? आतां नाहीं—उद्यांच दाखवायचं, आणि मन्यासाठीं पण एवढं काय आणलं आहे ? नाहीं, आतां नाहीं, उद्यां एकदम गम्मत करायची ! ( लता मुलांशीं खेळण्यांत रंगून जाते. मुलं तिला लपंडाव खेळूं या म्हणून सुचवतात. लपंडावाचा खेळ सुरू होतो.

मुलें डोळे बंद करून तोंडे दुसरीकडे फिरवितात. लता हळूच कोचामागें जाऊन दडते व 'सुट्ट्यो' म्हणून ओरडते. मुलें इकडे तिकडे तिला शोधतात. त्यांना ती सांपडत नाहीं. कोचामागून लता मोठ्यानें हंसते. मुलें कोचाकडे येतात. कोचामागून गुडघ्यावर पुढें येऊन लता डोळे मोठे करते व त्यांच्या अंगावर ओरडून त्यांना भेवडावते. एकच हंशा पिकतो. लता कोचामागें गुडघ्यावरच आहे, इतक्यांत रामनाथ उघड्या दरवाजावर येऊन कांहीं मिनिटें उभा राहतो. हंशा थांबल्यावर तो दारावर खट् खट् करतो. लता दचकून कपडे सांवरीत उभी राहाते. मुलें बावरल्यासारखीं होऊन तिच्याजवळ उभीं राहातात. लता पुढें होते. रामनाथ आंत येतो. )

**रामनाथ** : माफ करा मला. दार उघडं होतं, म्हणून एकदम पुढं आलों मी !

**लता** : ते बाहेर गेले आहेत. काय काम आहे तुमचं पुन्हां ?

**रामनाथ** : रमाकांताला बाहेर जातांना पाहिला, म्हणूनच आलों मी पुन्हां !

**लता** : ( जरा रागानें ) म्हणजे ?

**रामनाथ** : मला तुमच्याशीं कांहीं महत्त्वाच्या विषयावर बोलायचं आहे.

**लता** : ( दचकून ) माझ्याशीं ? ( मुलांना ) तुम्हीं जरा आंत जा हं बाळ. बायाआजीकडून खाऊ मागून घ्या. जा, मग खेळूं आपण हं. ( मुलें उजव्या बाजूच्या खोलींत जातात. )

**लता** : काय बोलायचं आहे तुम्हांला माझ्याशीं ? पहिल्या तारखेला अजून पुष्कळ अवकाश आहे !

**रामनाथ** : हो. तें खरं—पण दिवाळी तर अगदीं उद्यां परवांवर आली आहे ना—आणि हें पहा यंदाची तुमची दिवाळी आनंदांत किंवा दुःखांत घालवावी, हें ठरवणं सर्वस्वीं तुमच्याच हातांत आहे !

**लता** : म्हणजे ?—आज तुमचा हप्ता भरणं अगदीं अशक्य आहे मला.

**रामनाथ** : हसा असूं द्या. त्याच्याविषयीं बोलूं मग—मला दुसऱ्याच एका गोष्टीसंबंधानं बोलायचं आहे.

**लता** : कोणत्या ?

**रामनाथ** : मघाशीं तुमच्याकडे तुमची कोणी मैत्रिण आली होती, होय ना ? तिचं नांव मुक्ता, हें खरं का ?

**लता** : होय, मग ?

**रामनाथ** : तुमची आणि तिची अगदीं दाट मैत्री असेल, होय ना ?

**लता** : म्हणजे ?—तुमचं म्हणणं तरी काय ?

**रामनाथ** : नाहीं, तसं कांहीं नाहीं. माझी आणि तिचीहि कांहीं वर्षांपूर्वी फार मैत्री होती.

**लता** : आहे ठाऊक मला, मग ?

**रामनाथ** : हंः तिनं सांगितलं तर मग सर्व तुम्हाला ? इतकीं वर्षं ती उमरावतीला होती, ती आजच एकदम इथं कशाला आली ?

**लता** : हें पहा, तुम्हीं इकडच्या हाताखालचे नोकर आहां, आणि माझ्याशीं बोलतांना मर्यादा संभाळून बोला ! भलतेच प्रश्न विचारीत राह्यची तुम्हांला जरूर नाहीं ! इथं कां आली ती, हें तुम्हांला पाहिजे होय ? सांगतें तर. यांना कंपनीचे मॅनेजर नेमणार हें तिला कळलं, आणि तिला मुंबईत नौकरी पाहिजे होती. म्हणून ती इथें आली, आणि हे तिला आपल्या ऑफिसांत सेक्रेटरीची जागा देणार आहेत. मी स्वतः तिच्यासाठीं गळ घातली. समजलं तुम्हांला आतां ?

**रामनाथ** : अस्सं ! असं आहे काय !

**लता** : ( इकडे तिकडे फिरत ) हो, हो. बायकांच्याहि अंगांत कांहीं कमी धमक नसते. तुमच्यासारख्या इकडच्या हाताखालीं काम करणाऱ्या माणसांनीं संभाळून बोललं पाहिजे माझ्याशीं ! इकडच्यावर माझं वजन कांहीं असं तसं नाहीं !

**रामनाथ** : खरंच ?

**लता** : म्हणजे ? यांत संशय आहे कीं काय ?

**रामनाथ** : ( एकदम आवाज बदलून ) तर मग कृपा करून तुम्ही माझ्यासाठीं रमाकांतवर आपलं वजन खर्च कराच.

**लता** : काय—काय म्हणतां तुम्हीं ?

**रामनाथ** : तुमच्या पतीच्या हाताखालचा नोकर आहे ना मी ?— तर मग माझी ती नोकरी तशीच राहील असं करा.

**लता** : म्हणजे ? — तुमची नोकरी जाते आहे कुठें ?

**रामनाथ** : सरळच सांगतों तर तुम्हांला. उगाच छपवाछपवी कशाला ? मॅनेजर झाल्याबरोबर रमाकांत मला काढून टाकणार आहे, अशी गुणगुण माझ्या कानांवर आली, म्हणून मघाशीं मी भेटायला आलों होतों त्याला. त्याचा अगदीं निश्चयच झालेला दिसतो. तो मुळींच ऐकेना माझं. त्यांत आणखी तुम्ही ही तुमच्या मैत्रिणीची गोष्ट सांगतां आतां. म्हणजे झालंच ! तिला सेक्रेटरीची जागा देणार, म्हणजे मला काढून टाकणार हें ठरलंच.

**लता** : छे छे, तसं मुळीच नाहीं. तुमच्या जागेचा प्रश्नच आला नाहीं तेव्हां.—उगाच—

**रामनाथ** : असेल, पण एक गोष्ट मात्र निश्चित कीं, माझ्यासाठीं तुम्हांला तुमच्या पतीकडे गळ घातलीच पाहिजे.

**लता** : भलतंच काय ? तसं त्यांच्यावर माझं मुळींच वजन नाहीं.

**रामनाथ** : मला वाटतं तुम्हीं आत्तांच म्हणालांत कीं, रमाकांतावर तुमचं कांहीं असं तसं वजन नाहीं.

**लता** : तें खरं, पण असं भलतंच माझं त्यांच्यावर वजन असेल, असं तुम्हांला वाटतं तरी कसं ?

**रामनाथ** : तें राहूं द्या हो ! रमाकांताला मी शाळेपासून ओळखतों आहे. जगांतल्या सर्व नवऱ्यांपेक्षां तो कांहीं वेगळाच असेल असं मला नाहीं वाटत !

**लता** : संभाळून बोला, रामनाथ ! त्यांच्याविषयीं भलतंच कांहीं बोललेलं मला मुळींच खपायचं नाहीं, समजलं ? आणखी जास्त बोलाल तर बाहेरचा रस्ता बघावा लागेल तुम्हांला !

**रामनाथ** : बऱ्याच धीट आहांत तुम्ही !

**लता** : हो, हो. मला आतां तुमची मुळींच भीति वाटत नाहीं. पुढचा महिना आला कीं, त्या सर्व भानगडींतून मी मोकळी होईन.

**रामनाथ** : ( मोठ्या प्रयासानें राग आवरून ) हें पहा, वेळच आली तर या एवढ्याशा नोकरीसाठीं सर्व जगाला टक्कर द्यावयाला कमी करणार नाहीं मी !

**लता** : दिसतं तसं !

**रामनाथ** : मला तो नुसता पैशाचा किंवा पगाराचा प्रश्न नाहीं. माझं कारण दुसरंच आहे. आतां प्रसंगच आला आहे म्हणून सांगतों तुम्हांला. मला वाटतं सर्व जगाला माहित आहे, तें तुम्हांला माहित असेलच, कीं बऱ्याच वर्षांपूर्वी माझ्या हातून एक अपराध घडला होता.

**लता** : हं, ऐकलं आहे मीं तसं कांहीं तरी.

**रामनाथ** : कोर्टापर्यंत कांहीं तें खटलं गेलं नाहीं, पण जगांत मात्र माझी तेव्हांपासून सर्व बाजूंनीं कुचंबणा झाली. तेव्हां माझ्याकडे जें कांहीं थोडंबहुत भांडवल होतं, त्यावर मी थोडे दिवस सावकारीचा धंदा करीत होतों, तें तुम्हांला माहीत आहेच. कांहीं तरी करणं मला भागच होतं, आणि मला नाहीं वाटत कीं, बाकीच्या लोकांपेक्षां काहीं मीं विशेष तऱ्हेनें वाईट तो धंदा केला. नंतर मला ही सध्यांची नोकरी मिळाली. माझे मुलगे आतां मोठे होताहेत, आणि त्यांच्यासाठीं तरी लागेल ती धडपड करून समाजांत मान आणि प्रतिष्ठा मला मिळाविलच्चि पाहिजे. माझं माथं मला वर काढलंच पाहिजे. या नोकरीच्या आधारानें समाजांत वर येण्याचा मी प्रामाणिकपणें प्रयत्न करीत होतों, आणि आतां—आतां अगदीं पेला ओठांना लागायची वेळ आली असतांना तुमचा नवरा एका लाथेसरशीं पुन्हां मला मातीत मिळवणार !

**लता** : पण खरंच सांगतें मी तुम्हांला रामनाथ, माझ्या हातांत कांहींच नाहीं.

**रामनाथ** : कारण तुमची तशी इच्छा नाहीं म्हणून; पण तुम्हांला तसं करायला भाग पाडणं मात्र माझ्या हातांत आहे !

**लता** : म्हणजे ? मी तुमच्याकडून कर्जाऊ पैसे घेतले, हें तुम्हीं इकडे सांगणार कीं काय ?

**रामनाथ** : हं ! समजा मीं रमाकांताला सांगितलं तर ?

**लता** : तुमचा कमालीचा दुष्टपणा होईल तो.

( रडकुंडीला येऊन )

नकोग बाई ! इतक्या अभिमानानं आणि आनंदानें राखून ठेवलेलं माझं हें गुपित त्यांना अशा वाईट तऱ्हेनें कळलं तर !— आणि तें सुद्धां तुमच्यासारख्या त्यांच्या हाताखालच्या माणसाकडून ! मला अगदीं नकोशी होईल ती माझी स्थिति !

**रामनाथ** : नुसती नकोशी होईल ?

**लता** : ( एकदम ) जा सांगा ! तुमचंच वाईट होईल त्यांत ? त्यांना कळेल तुम्हीं कशा तऱ्हेचे दुष्ट कसाई आहांत तें, आणि मग तर अगदीं हटकून काढून टाकतील ते तुम्हांला.

**रामनाथ** : मी विचारलेल्या प्रश्नाला तुम्हीं उत्तर दिलं नाहीं अजून ! मीं तुम्हांला असं विचारलं होतें कीं, तुमची स्थिति तुम्हांला नुसती घरांतच नकोशी होईल का ?

**लता** : तुम्हीं सांगितलंच त्यांना, तर देऊन टाकतील ते सर्व कांहीं पैसे, आणि मग तुमचं तोंडहि बघायला नको आम्हांला.

**रामनाथ** ( एक पाऊल पुढें टाकून ) जरा लक्ष देऊन ऐका. एक तुमची आठवण तरी धड नाहीं किंवा पैशांचा व्यवहार म्हणजे काय हें तरी तुम्हांला माहीत आहे असें दिसत नाहीं. थोड्या बारीक सारीक गोष्टींची मला तुम्हांला आठवण करून द्यावी लागेल असं वाटतं !

**लता** : तुमचं म्हणणं तरी काय ?

**रामनाथ** : तुमचा नवरा जेव्हां आजारी होता, तेव्हां तुम्हीं हजार रुपये माझ्याकडे कर्जाऊ मागितलेत.

**लता** : होय, मग ?

**रामनाथ** : मीं तुम्हांला तेवढे पैसे देतों म्हणून सांगीतलं.

**लता** : होय, आणि दिलेतहि.

**रामनाथ** : पण ते पैसे मी तुम्हांला कांहीं अटीवर दिले. तुम्हीं आपल्या नवऱ्याच्या आजारीपणामुळें इतक्या कातावलां होतां आणि कसंहि करून आपल्या पतीला महाबळेश्वरास घेऊन जाण्या-करितां तुम्ही इतक्या आतुर झालां होतां कीं, त्या व्यवहारांतल्या बऱ्याचशा बारीक सारीक गोष्टी तुमच्या ध्यानांत राहिलेल्या दिसत नाहींत. तुम्हांला आठवत असेल, कीं त्या पैशाऐवजीं मी तुमच्या-कडून एक बॉंड घेतला—

**लता** : होय, आणि मीं त्याच्यावर सहीहि केली होती.

**रामनाथ** : बरोबर. पण बाईमाणसाकडून पैसे वसूल करणं एखादे वेळीं कठीण जाईल, म्हणून तुमच्या वडिलांची जामनि म्हणून त्या कागदावर सही व्हायला पाहिजे होती.

**लता** : व्हायला पाहिजे होती !—त्यांनीं केलीच होती सही त्यावर.

**रामनाथ** : तारखेची जागा मीं कोरीच सोडली होती त्या कागदा-वर. म्हणजे तुमच्या वडिलांनीं सही केली, कीं त्यांनींच त्या जागे-वर त्या दिवसाची तारीख घालावी. आठवतं कां तुम्हांला ?

**लता** : मला वाटतं,—हो, तसंच ठरलं होतं.

**रामनाथ** : मग मी तो कागद, तुमच्या वडिलांकडे पाठवून द्यायला तुमच्याकडे दिला.

**लता** : होय.

**रामनाथ** : आणि साहजिकच तुम्हीं तो लगेच पाठवून दिला असेल; कारण पांचसहा दिवसांच्या आंत तुम्हीं तो तुमच्या वडिलां-च्या सहीसह मला परत दिलात.—आणि नंतर मी सर्व पैसे तुमच्या हातांत दिले.

**लता** : होय. मग ? वेळच्या वेळीं तुमचे सर्व हप्ते मी भरीत नाहीं कां ?

**रामनाथ** : होय. नाहीं असं कांहीं म्हणतां येणार नाहीं. पण तें असूं द्या. मघाशीं काय म्हणत होतों मी ?–हो ! रमाकांत आजारी असतांना तुमची अगदीं तारांबळ उडाली असेल नाहीं ?

**लता** : हो तर, काय झालं नी काय नाहीं तें सांगतां सुद्धां येणार नाहीं.

**रामनाथ** : तुमचे वडील सुद्धां त्या वेळीं फार आजारी होते, नाहीं?

**लता** : जवळ जवळ ते मृत्युशय्येवरच पडले होते.

**रामनाथ** : आणि थोड्याच दिवसांनीं त्यांचा अंत झाला ?

**लता** : हो.

**रामनाथ** : बरोबर तारीख, महिना आठवतो का हो तुम्हांला, ते वारल्याचा ?

**लता** : हो. सप्टेंबरची एकोणतिसावी तारीख होती त्या दिवशीं.– माझा विजू दहा दिवसांचा होता.

**रामनाथ** : अगदीं बरोबर. मीं स्वतः खात्री करून घेतली आहे त्या तारखेची. पण त्यामुळें ( खिशांतला एक कागद काढीत ) एक लहानसा घोंटाळा झाला आहे या कागदांत, त्याचं मला मोठं कोडं पडलं आहे !

**लता** : कसला घोंटाळा ?–मला नाहीं माहीत.

**रामनाथ** : घोंटाळा एवढाच आहे कीं, तुमच्या वडिलांनीं आपल्या मृत्यूनंतर तीऽन दिवसांनीं या बॉंडवर सही केली आहे.

**लता** : म्हणजे ? तुमचं म्हणणं काय आहे, समजत नाहीं मला !

**रामनाथ** : तुमचे वडील २९ सप्टेंबर रोजीं वारले; आणि हा बॉंड जर तुम्हीं जरा निरखून पहाल, तर त्यांनीं २ आक्टोबर रोजीं त्यावर आपली सही केली आहे, असं आढळून येईल तुम्हांला. हा एक घोटाळाच आहे, नाहीं ? ( लता स्तब्ध रहाते. ) हा घोंटाळा जरा मला स्पष्ट करून सांगाल कां ? ( लता तशीच स्तब्ध उभी रहाते. ) दुसरीही एक मोठी आश्चर्यकारक गोष्ट आहे यांत. आणि ती ही कीं, २ आक्टोबर ही तारीख आणि इसवी सन, हें

कांहीं तुमच्या वडिलांचें हस्ताक्षर दिसत नाहीं. तें तर माझ्या ओळखीचं हस्ताक्षर आहे. पण मला वाटतं त्यांत कांहीं मोठंसं नाहीं. तुमचे वडील कदाचित् विसरले असतील तारीख घालायला, आणि दुसऱ्या कोणी तरी तुमच्या वडिलांच्या मृत्यूची बरोबर तारीख माहीत नसलेल्या माणसानं चुकून घातली असेल ती तारीख, त्यांत कांहीं विशेष नाहीं. पण मुख्य महत्त्वाची गोष्ट म्हणजे सही, आणि मला वाटतं ती अगदीं तुमच्या वडिलांनींच दस्तुर खुद्द केली आहे. होय ना ? तुमच्या वडिलांनींच ही इथें सही केली ? ( कागद पुढें करून सहीच्या ठिकाणीं बोट ठेवीत. )

**लता** : ( थोडा वेळ स्तब्ध रहाते. नंतर मान वर उडवते व बेदरकारपणें त्याच्याकडे पहात ) नाहीं, मुळींच नाहीं. मीं केली ती बाबांची सही.

**रामनाथ** : हा कबुलीजबाब देण्यांत काय धोका आहे, याची कल्पना आहे तुम्हांला ?

**लता** : कसा काय ?–तुमचे सर्व पैसे लवकरच फिटले जातील.

**रामनाथ** : तुम्हांला एक प्रश्न विचारूं का ?–तुम्हीं आपल्या वडिलांकडे कां नाहीं पाठविलात तो कागद ?

**लता** : शक्यच नव्हतं तें मुळीं. बाबा मृत्युशय्येवर पडले होते. आणि त्या वेळीं मीं जर त्यांची सही मागितली असती, तर सर्व कांहीं मला त्यांना सांगावं लागलं असतं. अर्थात् पैसे कशाला पाहिजेत म्हणून त्यांनीं विचारलंच असतं, आणि ते इतके आजारी असतांना, त्यांना इकडचं दुखणं इतकं कठीण आहे हें सांगणं शक्यच नव्हतं मुळीं.

**रामनाथ** : मग तुम्ही महाबळेश्वरास गेलांच नसतां तर बरं झालं असतं.

**लता** : छे छे, तें शक्यच नव्हतं. इकडल्या जिवाचा प्रश्न होता तो. मीं मुळींच ऐकलं नसतं.

**रामनाथ** : पण तसं करण्यांत मला तुम्हीं धडधडीत फसवीत होतां

हें ध्यानांत सुद्धां आलं नाहीं तुमच्या ?

**लता** : मी त्याचा विचार सुद्धां करणं त्या वेळीं शक्य नव्हतं. तुमचं काय होत होतं, याची कुणी पर्वा करायची त्या वेळीं ? मला तर तुमचा तिटकारा आला होतां तेव्हां. इकडची स्थिति किती बिकट आहे, हें पूर्णपणें माहीत असून सुद्धां तुम्हीं किती निर्दयपणें अडवून धरीत होतां मला ! म्हणे सही पाहिजे आणि जामीन पाहिजे, आणि इतकं व्याज पाहिजे, आणि एवढे हप्ते पाहिजेत !

**रामनाथ** : मला वाटतं, तुमच्या हातून काय गुन्हा झाला याची स्पष्टशी कल्पना तुम्हांला अजून आलेली नाहीं. पण एक गोष्ट मात्र तुम्हांला स्पष्ट सांगून ठेवावीशी वाटते, आणि ती हीच कीं, ज्यामुळें समाजांत माझ्या तोंडाला काळिमा लागला, आणि कुठंहि वर तोंड काढायची मला सोय उरली नाहीं तो माझ्या हातून घडलेला गुन्हा सुद्धां तुमच्या या गुन्ह्यापेक्षां यत्किंचितहि जास्त भयंकर स्वरूपाचा नव्हता, आणि सबंध आयुष्यांत एकदांच,—एकदांच घडलेल्या त्या चुकीचीं फळं मी अजून भोगीत आहे.

**लता** : काय ! आपल्या पतीचे प्राण वांचविण्याकरितां ज्याप्रमाणें वाटेल तें करायला मीं मागंपुढं पाहिलं नाहीं, त्याप्रमाणें आपल्या पत्नीच्या जिवाकरितां तुमच्या हातून तो गुन्हा घडला ?

**रामनाथ** : तुमच्या नजरेसमोर काय उदात्त उद्देश होता, हें कायदा जाणत नाहीं, समजलांत !

**लता** : गाढवच असला पाहिजे तर मग तो कायदा !

**रामनाथ** : कायदा गाढव असो कीं नसो, हा कागद जर मी कोर्टापुढें सादर केला, तर याच कायद्याप्रमाणें तुमची चवकशी होईल, हें ध्यानांत ठेवा.

**लता** : छट् ! मुळींच विश्वास बसत नाहीं माझा. मृत्युशय्येवर पडलेल्या आपल्या वडिलांना विनाकारण काळजींत आणि त्रासांत न घालण्याचा त्यांच्या मुलीला अधिकार नाहीं काय ? पत्नीनें आपल्या पतीचे प्राण वांचवूं नयेत काय ? मला कायद्याची कांहीं

विशेष माहिती नाहीं, पण एवढी मात्र माझी खात्री आहे कीं, अशा गोष्टी कराव्या म्हणून सांगणारे कायदे असलेच पाहिजेत पुस्तकांत. तुम्ही एल्एल्. बी. आहांत, तुम्हांला माहीत असतीलच असले कायदे ! तुम्हांला कांहींच माहिती दिसत नाहीं.

**रामनाथ :** असेल माझं अज्ञान त्यांत ! पण आतां जरा आपल्या दोघांच्या व्यवहारासंबंधीं बोलूं. तुम्हांला वाटतो तितका कांहीं मी मूर्ख नाहीं, समजलांत ! तें कांहींहि असो. तुम्हांला वाटेल तसं करा, पण एका गोष्टीची मात्र याद राखून ठेवा कीं, पुन्हां जर माझी समाजांतील प्रतिष्ठा जायची असेल, तर माझ्याबरोबर तुमचीहि गेल्याशिवाय रहाणार नाहीं. ( तिच्यासमोर जरा डोकें वांकवतो व निघून जातो. )

**लता :** ( कांहीं वेळ अगदीं विचाराक्रांत दिसते. नंतर मान उडवून) कांहीं तरीच ! उगाच भेवडावतो आहे मला. त्याला वाटतं तशी मी कांहीं मूर्ख नाहीं. ( मुलांचे कपडे इकडे तिकडे कोचावर पडले आहेत ते एकत्र करून त्यांच्या नीट घड्या करण्यांत चूर होऊं पहाते. ) तरी पण—पण छे :, शक्यच नाहीं तें. इकडच्या प्रेमामुळें केलं मीं तें.

**मुलें :** ( *उजव्या बाजूच्या खोलीच्या दारांत येऊन* ) आई, गेले ना कोण ते ? आतां पुन्हां आपण खेळायचं ना ?

**लता :** कुणी आलं होतं म्हणून सांगायचं नाहीं हं आल्यावर !

**मुलें :** नाहीं आई. पण खेळायचं ना ?

**लता :** नाहीं रे बाळांनो, आतां नाहीं. मग केव्हां तरी हं ! जा बाया-आजी काय करते, बघा जा. मला काम आहे आतां खूप. दिवाळीचे दिवे लावायचे आहेत ना जिकडे तिकडे ? ( त्यांना एकएकांना हळूं हळूं आंत घालवते. टेबलावर एक अर्धवट शिवलेलें पोलकें पडलें आहे. त्याला सुईदोरा टोंचून ठेवलेला आहे. तें उचलते आणि कांहीं वेळ शिवूं लागते, पण लगेच शिवणें थांबवून ) नकोच ! ( पोलकें बाजूला टाकते, उठून उभी राहते, दरवाजाकडे जाऊन

भिमाला हांक मारते. ) भिमा, ( कपाटाकडे जाते, आणि कपाट उघडते. कपाट तसेंच उघडें टाकून ) छ, छे, शक्यच नाहीं तें. ( पुन्हां भिमाला हांक मारते. ) भिमा, ऐकलंस कीं नाहीं ? ( भिमा येते. )

**भिमा** : काय बाईसाहेब ?

**लता** : कुठें, कुठें ते जपानी दिवे लावायचे म्हणून सांगितलं आहे साहेबांनीं ?

**भिमा** : ते नवीन आणलेले रंगीत दिवे ना ? दिवाणखान्यांतल्या चार कोपऱ्यांत चार लावायचे म्हणून सांगितलं आहे बाई.

**लता** : हं आणखी ?

**भिमा** : आणखी कांहीं मला आठवत नाहीं. हां, मुलांसाठीं तो आकाशदिवा बाहेर लावायचा बाई जिन्यावर !

**लता** : बरं, जा तूं. ( भिमा जाते. ) ( दिवाणखान्यांतल्या छताकडे न्याहाळून पहात )—या इथें एक लावावा—नको जरा बाजूलाच बरा दिसेल—काय भयंकर माणूस आहे ! छे पण, शक्यच नाहीं तें—त्यांत कसला आला आहे गुन्हा—अगदीं शोभिवंत दिसला पाहिजे दिवाणखाना त्या चारी दिव्यांनीं. दिवाळींत त्यांना अगदीं जें जें आवडेल तें तें सगळं केलं पाहिजे.—मी काय करणार नाहीं तुमच्यासाठीं, गडे ! तुमच्या जिवाच्या सुखासाठीं काय वाटेल तें करीन. ( दरवाजा उघडून रमाकांत आंत येतो. त्याच्या काखेंत बरेचसे कागद आहेत. ) हें काय, आज अगदीं लवकर ?

**रमाकांत** : ( टेबलावर कागद, हॅट आणि काठी ठेवीत ) हं. आलों झालं. कुणी आलं होतं इकडे.

**लता** : इकडे ? नाहीं.

**रमाकांत** : म्हणजे ? आश्चर्य आहे. इकडून बाहेर पडतांना रामनाथला पाहिलं मीं.

**लता** : अरे हो ! विसरलें मी. रामनाथ येऊन गेले खरे.

**रमाकांत** : लता, तुझ्या तोंडावरूनच दिसतं आहे कीं, तो स्वतः-

साठीं रदबदली करण्यासाठीं तुला सांगायला आला होता.

**लता** : होय.

**रमाकांत** : आणि जणूं काय कुणी सांगितल्याशिवाय तूं स्वतःच त्याच्यासाठीं रदबदली करते आहेस असं दाखवायला त्यानें तुला सांगितलं होतं, होय ना ? तो इथें आला होता ही गोष्ट माझ्यापासून लपविणार होतीस तूं !

**लता** : होय गडे, पण—

**रमाकांत** : लता, लता, कसं तूं करूं शकतेस असं ? तशा माणसाला बोलूं तरी कसं दिलंस तूं ? बरं तें असो, वर आणखी त्याला वचन दिलंस तूं रदबदली करायचं ! आणि इतकं सगळं करून माझ्याशीं खोटं बोलत होतीस !

**लता** : खोटं ?

**रमाकांत** : इथं कुणी आलं नाहीं म्हणून सांगितलंस नाहीं मला तूं ? ( तिच्यासमोर बोट हलवीत ) माझ्या लाडक्या चिमणीनं पुन्हां कध्धीं असं करतां कामा नये हं ! चिमणीची चोंच कशी नेहमीं निर्मळ असली पाहिजे—खोटे शब्द येतां कामा नयेत तींतून. ( तिच्या कमरेभोंवतीं हात टाकून ) होय ना ? आतां कसं पटलं ? ( हात काढून घेतो ) बरं. असूं द्या तें. ( खुर्चीवर बसत ) आज हवा मोठी छान आहे. ( कागद वाचूं लागतो. )

**लता** : ( पडलेलें शिवण उचलून किंचित् शिवल्यावर ) ऐकलं कां ?

**रमाकांत** : काय ?

**लता** : सर रायचंद शेटकडे पर्वा पार्टी आहे ना ? तिथं किती तरी मोठमोठ्या बायका येणार आहेत म्हणे, आणि मला तिथं गायलंच पाहिजे म्हणून अगदीं आग्रहाचा निरोप आला आहे लेडी साहेबांचा.

**रमाकांत** : मग काय, एखाद्या महाराणीसारखे कपडे घालून जायचा विचार आहे कीं काय तुझा ?

**लता** : छे गडे, कांऽऽहीं सुचत नाहीं मला.

**रमाकांत** : म्हणजे ?

**लता** : काय करावं तेंच समजत नाहीं. एकदां हें घालावंसं वाटतं, आणि लगेच तें वेडगळपणाचं कांहीं तरी वाटूं लागतं !

**रमाकांत** : हं, आपण वेडगळपणा करतों हें माझ्या चिमणीला कळायला लागलं वाटतं आतां ?

**लता** : ( त्याच्या खुर्चीच्या मागें उभी रहाते व खुर्चीच्या पाठीवर हात ठेवते. ) इतकं कसलं हें काम चाललं आहे ?

**रमाकांत** : हं काय ?

**लता** : कसले कागद हे एवढे ?

**रमाकांत** : ऑफिसचे आहेत ते.

**लता** : म्हणजे ? एव्हांच ?

**रमाकांत** : हो, पहिली तारीख कांहीं लांब नाहीं राहिली आतां. मॅनेजरच्या जागेचा चार्ज मिळाल्याबरोबर सर्व नवीन व्यवस्था करावयाची. नोकर वर्गांत सुद्धां वाटेल तो फेरफार करण्याचा हुकूम मिळाला मला आज. एव्हांपासून मला सर्व तयारी ठेवली पाहिजे.

**लता** : हं. तरीच बिचारे रामनाथ–

**रमाकांत** : ( गंभीरपणें ) हुं.

**लता** : ( त्याच्या खुर्चीला अगदीं बिलगून त्याच्या केंसांवर हात फिरवते. ) आतां काम नसतं इकडे, तर माझ्यासाठीं कांहीं करायला सांगणार होतें मी.

**रमाकांत** : काय तें ? सांग ना.

**लता** : तो सळीचा शालू आहे ना माझा ? त्याला मॅच होईल अशा रंगाचा ब्लॉऊझ पाहिजे मला. अगदीं इकडच्याशिवाय नेमक्या रंगाची निवड कुणालाच यायची नाहीं. मग याल ना माझ्याबरोबर मार्केटांत ?

**रमाकांत** : ओ हो ! शेवटीं माझी मदत मागावी लागली अं ?

**लता :** अगदीं खरं. तुमच्या मदतीशिवाय कांहीं—कांहीं करतां येणार नाहीं मला.

**रमाकांत :** बरं आहे. येईन ना मी तुझ्याबरोबर सांगशील तेव्हां.

**लता :** कित्ती कित्ती चांगले आहांत तुम्ही ! ( छताकडे पहात ) तो रंगीत ग्लोब याच्न कोपऱ्यांत लावावा नाहीं ? पण गडे, खरंच त्या रामनाथानं कांहीं फाऽऽर वाईट गुन्हा केला होता ?

**रमाकांत :** अग, एका दस्तऐवजावर त्यानं खोटी सही केली होती. कल्पना आहे तुला तो कसला गुन्हा होतो त्याची ?

**लता :** पण कदाचित् प्रसंगांत सांपडून त्याचा नाइलाज झाला असेल तेव्हां ?

**रमाकांत :** असेल, कदाचित् मागचा पुढचा विचार सुद्धां केला नसेल त्यानें. मनुष्याच्या हातून आयुष्यांत एकदां चूक झाली, म्हणून त्याच्या कपाळावर कायमचा छाप मारण्याइतका कांहीं मी अंतः-करणशून्य नाहीं.

**लता :** नाहींच मुळीं तुम्ही तसे. इकडचं अंतःकरण तसं नाहींच मुळीं.

**रमाकांत :** तशी चूक झाली तर हरकत नाहीं, पण आपल्या चुकीचं प्रायाश्चित्त घेऊन खुलेपणानें सर्व जगापुढें आपला गुन्हा कबूल करून त्याबद्दल जी शिक्षा व्हायची ती भोगली, तर गोष्ट वेगळी.

**लता :** शिक्षा ?

**रमाकांत :** पण रामनाथानं तसं कांहींच केलें नाहीं. त्यानं अगदीं बेमालुम युक्ती करून तो निसटला त्यांतून. आणि म्हणून त्याला समाजांत कांहीं किंमत नाहीं,

**लता :** पण तुम्हांला वाटतं त्यानं तसं केलं म्हणून ?

**रमाकांत :** असल्या गुन्हेगाराला कसं पावलोंपावलीं खोटं बोलावं लागतं. फार कशाला ? प्रत्यक्ष स्वतःच्या मुलांमाणसांशीं कपट करावं लागतं. कोण भयंकर जिणं हें, नाहीं लता ?

**लता :** कसं ?

रमाकांत : कसं ? सर्व घरांतलं वातावरण खोटेपणानें दूषित झालेलं असतं. अशा ठिकाणीं मुलांच्या प्रत्येक श्वासाबरोबर तें विषारी वातावरण त्यांच्या रक्तांत शिरतं.

लता : ( त्याच्या अगदीं जवळ जाऊन ) खरंच गडे ?

रमाकांत : किती तरी वेळां मला अनुभव आला आहे याचा. तरुणवयांत ज्यांच्या हातून गुन्हे घडतात, त्या बहुतेकांच्या आया खराब चालीच्या असतात, असं आढळून येतं.

लता : आयाच असं कां म्हणतां तुम्ही ?

रमाकांत : बहुतेक आईची छाप पडते मुलांवर. वाईट बापांचीहि मुलं वाईट होतात, यांत कांहीं संशय नाहीं. वकिली करणारांना तर याचा नेहमींचाच अनुभव आहे. हा रामनाथच घे ना. स्वतःविषयीं सर्व कांहीं खोट्या गोष्टी सांगून, आपल्या मुलांच्या कानांत असत्याचं विष हा एव्हांपासूनच पेरीत आहे. म्हणूनच मी म्हणतों कीं, नीतिअनीतीच्या कल्पना तो अगदीं कोळून प्याला आहे. (तिचा हात धरून हालवीत ) म्हणून मी माझ्या चिमणीला सांगत होतों, कीं त्या माणसासाठीं रदबदली करूं नको. दे मला वचन त्याच्याविषयीं पुन्हां बोलणार नाहीं म्हणून. काय ? असं काय करतेस, देणार ना मला वचन ? नाहीं ना बोलायचं त्याच्याविषयीं पुन्हां ? यापुढें त्याला माझ्या हाताखालीं ठेवणं अगदीं अशक्य आहे मला. अशा माणसांच्या संगतीचा मनापासून किळस येतो मला.

लता : ( त्याच्या हातांतून आपला हात काढून घेते, आणि पुन्हां कोचाकडे जाऊन शिवणकाम हातांत घेते. ) काय उकडतं आहे आज ? माझं शिवायचं सर्वच राहिलं आहे.

रमाकांत : ( उठतो, आणि टेबलावरचे सर्व कागद गोळा करीत ) आणि मलाहि जेवायच्यापूर्वीच या कागदांची सर्व भानगड आटोपली पाहिजे. उद्यां जायचं ना आपण दोघांनीं मार्केटांत ? ( 'चिमणी !' असं म्हणून तिच्या गालावर लाडिकपणें चापट मारतो, व डाव्या बाजूच्या आपल्या खोलींत जातो. )

**लता :** ( जरा थांबून अगदीं बसक्या आवाजांत. ) छे छे, कांहीं खरं नाहीं त्यांत. शक्यच नाहीं तें. कसं असेल शक्य ! ( उजव्या बाजूच्या खोलीच्या दारांत बाया येते. )

**बाया :** अग बाई, जरा मुलांना घे ना जवळ ? सारखीं रडत आहेत, आणि तूं भरवल्याशिवाय जेवणारच नाहीं म्हणतात.

**लता :** नाहीं, नाहीं, नको ग बाया मला त्रास देऊं. तूंच भरव त्यांना जा.

**बाया :** बरं बाई. ( जाते. )

**लता :** ( पांढरी फटीक होऊन भीतीनें थरथरत ) बाळांच्या मनांत विष पेरायचं ! घरांतलं विषारी वातावरण ! नकोग बाई ! ( जरा स्तब्ध उभी रहाते. बेदरकारपणें मान उडवून ) कांहीं खरं नाहीं त्यांत. तें खरं असणं शक्यच नाहीं मुळीं.

( पडदा पडतो )

---



[ तोच दिवाणखाना. संध्याकाळची वेळ. पांच साडेपांच वाजले आहेत. रंगीत कागदाचे चार जपानी दिवे, छताच्या चार कोपऱ्यांत लटकविलेले दिसतात. अर्थात् या वेळीं त्यांत मेणबत्या लावलेल्या नाहींत. पोलक्याच्या सुंदर रेशमी कापडाचे कापलेले तुकडे, कातर, सुईदोरा व सुताचें रीळही टेबलावर पडलें आहे. दरवाजाशेजारच्या खिडकींतून बाहेर जिन्यावर लावलेला एक रंगीत आकाशदिवा दिसत आहे. लताचें शिवणकाम कोचावर पडलें आहे. लता एकटीच आहे व अस्वस्थपणें इकडे तिकडे फिरते आहे. कोचाकडे येऊन थांबते व शिवणकाम उचलते. ]

**लता :** ( पुन्हां शिवणकाम कोचावर फेंकून देऊन ) कुणी तरी येतं आहे वाटतं ! ( दरवाजाशेजारच्या खिडकीकडे जाऊन

जिन्याकडे पाहाते. ) छेः—नाहीं, कुणी नाहीं. आज कोण कशाला येतं आहे ! पण कदाचित् ( दरवाजा उघडून बाहेरच्या बाजूला बघते. परत येऊन ) छेः, नाहीं, पत्राच्या पेटींत सुद्धां कांहीं नाहीं. अगदीं रिकामी आहे. ( पुढें येते ) कांहीं तरी बोलला तो काल !—मला नाहीं वाटत, खरोखर तो करील असं—नाहीं कर-णार तो—शक्य तरी आहे तें ! माझीं बाळं किती छान आहेत. ( बाया हातांत एक मौल्यवान, सळीचा शालू घेऊन, उजव्या खोलींतून बाहेर येते.

**बाया** : हाच नेसणार आहेस ना ग शालू उद्या ?

**लता** : हो. काढलास वाटतं ?

**बाया** : पण त्याला जरा इस्तरी करून घेतली पाहिजे.

**लता** : पाहिजे कशाला इस्तरी बिस्तरी ?—चिंध्या झाल्या त्याच्या तरी कुणाला पर्वा आहे ?

**बाया** : काय ?—बोलते आहेस काय तूं ?

**लता** : करायचा आहे काय मला शालू तो ?

**बाया** : म्हणजे ? तापबीप आला आहे कीं काय तुला ?

**लता** : तापच काय ! तापापेक्षां आणखी कांहीं येईल तर बरं होईल !—मुलं कुठं आहेत ग ?

**बाया** : खेळताहेत बिचारी खालीं. —लता, कालपासून असं काय करते आहेस ग ? त्यांना धड जवळ सुद्धां घेत नाहींस तूं ! —तुझ्या शिवाय थोडा वेळ तरी रहायची संवय त्यांना आहे का ग ?

**लता** : बाया, पण आतां तीं मोठी होताहेत; त्यांना हळूहळू माझ्याशिवाय रहायची संवय नको का लावायला ?

**बाया** : मुलांचं काय बापडयांचं ! लावावी ती संवय लागते त्यांना.

**लता** : खरंच, बाया ! समज, त्यांची आई कायमची निघून गेली, तर विसरतील का ग तीं तिला ?

**बाया** : असं काय ? —काय बोलते आहेस तरी काय तूं आज ?

**लता** : बाया, खरंच. तुला एक गोष्ट विचारतें ती सांगशील कां ग

मला ? किती दिवस विचारीन, विचारीन म्हणतें आहे मी. –मी अगदीं एवढीशी होतें, तेव्हांपासून तूं आमच्याकडे आहेस, नाहीं ? पण काय ग, तुझीं लहानगीं दोन मुलं दुसऱ्याच्या आंगावर टाकून कसं येववलं तुला आमच्याकडे कामाला ?

बाया : कसं येववलं !–ही चिमणी मला तेव्हां माझ्या मुलीसारखीच वाटली ! ( तिच्या केसांवरून हात फिरवीत ) किती गुणी बाळ होतीस तूं तेव्हां !

लता : तें खरं.–पण कसंग सोडवलं तुला तुझ्या मुलांना ?

बाया : पोटासाठीं काय वाटेल तें करावं लागतं बाळ !

लता : पण तुझी मुलगी तुला अगदीं पार विसरून गेली का ग ?

बाया : छे, भलतंच ! तसं कसं होईल ?–तिचं लग्न झालं, तेव्हां गेलें नव्हतें मी ?

लता : ( तिच्या गळ्याभोंवतीं दोन्ही हात घालून ) बाया, किती प्रेमळ आहेस तूं ! आईनें सुद्धां केली नसती अशी माझी जतन केलीस तूं !

बाया : मग,–तुझी आई तुला सोडून गेल्यावर मीच नाहीं का तुझी आई झालें ?

लता : आणि, माझ्या बाळांची आई त्यांना सोडून गेली, तर त्यांनासुद्धां तूं–इश्श ! कांहीं तरी बहकतें आहे मी ! ( एकदम शालूची घडी मोडते. ) जा, तूं बाया. भिमाला सांग शालूला इस्त्री करून आणली पाहिजे म्हणून. ( बाया जाते. )

लता : ( डोक्यांतले खरे विचार बाजूला काढून, दुसरेच विचार करण्याचा प्रयत्न करीत. ) छेः, भलतंच ! त्याचा विचारच सोडून दिला म्हणजे झालं.–काय बरं उद्यां घालावं ?–कुड्या हिऱ्याच्याच बऱ्या दिसतील.–पण मग बांगड्या कसल्या घालाव्या ? गिनीगोल्डच्या ?–छे,–मोत्यांच्याच काढून ठेवतें बाहेर–पण तो आला आत्तां–आला पुन्हां तोच विचार ! ( एकदम किंकाळीच्या स्वरांत ओरडते. ) अगबाई ! आलंच वाटतं कुणी ! ( दरवाजाकडे जाते,

पण दरवाजा उघडावा किंवा नाहीं हें तिचें तिलाच समजत नाहीं. दरवाजावर पुन्हां आवाज होतो. भेदरून जाऊन दरवाजा उघडते. मुक्ता आंत येते. )

लता : हात्तिच्या ! तूं का ग ती मुक्ता ? दुसरं बाहेर कुणी नाहीं ना ? बरी आलीस वेळेवर.

मुक्ता : सकाळीं तूं निरोपच्च तसा पाठवला होतास ना ?

लता : हो गडे. त्या शालूला मॅच होईल असं कापड आणलं ब्लॉऊजसाठीं, पण कसल्या डिझाईनचा शिवावा, कांहीं सुचेचना मला. उद्यां संध्याकाळीं रायचंद शेटकडे पार्टी आहे ना ? मोठ्या-मोठ्या बायका येणार आहेत तिथं म्हणे; आपले कपडे जरा शोभण्यासारखे पाहिजेत. कांहींच सुचत नाहीं मला.

मुक्ता : त्यांत काय मोठंसं ! आत्तां शिवून देईन मी तुला. पण एका अटीवर हं !

लता : काय ?

मुक्ता : उद्यां मी मुद्दाम बघायला येईन तुझा परीचा थाट. मी यायच्या अगोदर कपडे बदलायचे नाहींत हं.

लता : बरं, बरं ! हें पाहिलंस कां कापड ? ( टेबलावरचें पोलक्याचें कापड मुक्ताला आणून दाखविते. )

मुक्ता : वः, बेतून वगैरे ठेवलं आहेस तूं ! आतां फक्त शिवायचं आहे वाटतं ?

लता : हो. आणि लेसहि लावली पाहिजे.

मुक्ता : पण, काय ग, ते डॉ. संत नेहमींच कालच्यासारखे उदास, निराशलेले असतात का ग ?

लता : नाहीं, नाहीं. काल जरा जास्तच होते ते, सांगूं कां तुला ? आज किती वर्षं झालीं, त्यांना एक भयंकर रेंगाळणारा रोग झाला आहे. त्यांच्या पाठीच्या कण्याला क्षयाचे जंतु लागू पडले आहेत म्हणे—काय बाई त्याला कन्झम्प्शन् ऑफ स्पाइन् असं कांहीं म्हणतात ! बिचारे डॉक्टर ! त्यांचे वडील म्हणे फार वाईट होते.

कुठचं व्यसन म्हणून त्यांनीं कांहीं बाकी ठेवलं नव्हतं.—आणि म्हणून हे असले आनुवंशिक रोग त्यांच्या मुलाला लहानपणापासून लागले.

मुक्ता : ( हातांतलें शिवण एकदम खालीं टाकून ) अगबाई, लता, असल्या गोष्टी समजल्या तरी कुठें तुला ?

लता : ( इकडे तिकडे फिरत ) अंः, अग लेकुरवाळ्या बाईकडे बसायला आजुबाजूच्या किती तरी लग्न झालेल्या बायका येतात. त्या बोलतात असल्या गोष्टी केव्हां केव्हां.

मुक्ता : ( शिवण पुन्हां हातांत घेऊन जरा वेळ थांबून ) डॉक्टर संत इथें रोज येतात ?

लता : अगदीं रोज, चुकल्याशिवाय. यांचे ते अगदीं जीवश्चकंठश्च मित्र आहेत, आणि माझ्याशींहि त्यांचा फार स्नेह आहे. ते अगदीं एक घरांतल्याच माणसासारखे आहेत म्हणेनास.

मुक्ता : पण काय ग, स्पष्टच विचारतें तुला. अगदीं सरळ मनाचा माणूस आहे का ग तो ? सरळ म्हणजे काय—उगाच आपलं प्रत्येकाला त्याच्या तोंडावर चांगलं चांगलं म्हणून त्याच्याशीं भलेपणा जोडायचा, अशा प्रकारचा मनुष्य नाहींत ना तो ?

लता : छे छे, मुळींच नाहींत.—पण तुला असा संशय तरी कां येतो ?

मुक्ता : काल जेव्हां तूं माझी त्यांच्याशीं ओळख करून दिलीस तेव्हां ते एकदम म्हणाले, कीं या घरांत माझं नांव किती तरी वेळां काढलं जातं. पण रमाकांतांना पहावं तर, मी कोण नि काय, याची कांहींच कल्पना दिसली नाहीं. मग डॉक्टर असं कसं म्हणत.—

लता : त्यांत डॉक्टरांची कांहीं चूक नाहीं ग, मुक्ता. यांचं माझ्यावर इतकं प्रेम आहे कीं, मी अगदीं नेहमीं यांच्याच जवळ असावं असं यांना वाटतं—अग पहिल्या पहिल्यांना तर मी एखाद्या माहेरच्या माणसाचं नांव काढलं तरी यांना राग येत असे. इतका मत्सर वाटे यांना दुसऱ्यांचा. म्हणून मग मी दुसऱ्या कुणाच्या

गोष्टीच बोलायचं सोडून दिलं. तेव्हां साहजिकच मी यांच्यासमोर बोलत नसे तुझ्याविषयीं. पण डॉक्टरांना नेहमीं तुझ्या गोष्टी सांगत असे.

**मुक्ता :** हें पहा लता, अजून ऱ्याचशा गोष्टींच्या बाबतींत तूं पोऽर आहेस. आणि मी तुझ्यापेक्षां नुसती वयानेंच नव्हे तर खरोखर जगाच्या अनुभवानें सुद्धां थोडीशी वडील आहें. माझं ऐकायचं असेल तर स्पष्टच सांगतें मी तुला, तूं या डॉ. संतांच्या या भानगडीचा एकदां कायमचा निकाल लावून टाक.

**लता :** कसल्या भानगडीचा निकाल ?

**मुक्ता :** काल कायसंसं तूं म्हणत होतीस ना, कीं कुणा एका श्रीमंत वृद्ध गृहस्थाची तुझ्यावर माया जडली नि मग तो मेला आणि त्यानें आपली सर्व इस्टेट—

**लता :** तो मायाळू गृहस्थ फक्त कल्पनेतलाच होता बिचारा, बरं कां—पण मग म्हणणं काय तुझं ?

**मुक्ता :** डॉ. संतांजवळ बरेच पैसे आहेत ?

**लता :** हो, आहेत.

**मुक्ता :** आणि त्यांच्या नात्यापात्याचं दुसरं कुणी नाहीं ?

**लता :** नाहीं, कुणी नाहीं. अग पण—

**मुक्ता :** आणि ते दररोज चुकल्याशिवाय इथं येतात ?

**लता :** हो, मी म्हटलं ना ?

**मुक्ता :** पण हा एवढा शिकला सवरलेला संभावित मनुष्य इतका अविचारी कसा ?

**लता :** तुझं म्हणणं तरी काय, मला कांहींच समजत नाहीं !

**मुक्ता :** लता आतां माझ्याशीं तरी लपंडाव करूं नकोस ! तुला ते हजार रुपये कुणी दिले हें मला समजत नाहीं होय ?

**लता :** तुझं काय माथं फिरलं आहे कीं काय, मुक्ता ? तुला असं वाटलं तरी कसं ? इतक्या घरोब्याचे स्नेही ते—दररोज इथं येणार—त्यांच्याकडून मी पैसे घेईन, असं तुला वाटतं तरी कसं ? तसं केलं

असतं तर माझी किती भयंकर घाणेरडी स्थिति झाली असती, कल्पना आहे तुला ?

मुक्ता : मग, त्यांनीं नाहीं वाटतं दिले ?

लता : खात्रीनें नाहीं. त्यांच्याकडून घेण्याचा विचार सुद्धां माझ्या मनाला शिवला नाहीं. आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्या वेळेला त्यांना इतके पैसेच मिळत नव्हते मुळीं. त्यांना मऽग मऽग चांगले पैसे मिळूं लागले.

मुक्ता : बरं झालं नव्हते पैसे म्हणून, नाहीं तर तूं–

लता : छे, छे. डॉ. संतांकडून पैसे घ्यायचा विचार सुद्धां माझ्या मनांत आला नसता.–एवढं मात्र खरं, कीं मी जर मागितले असते तर खात्रीनें–

मुक्ता : पण तूं मागणं बरंच नव्हे मुळीं–

लता : नव्हेच. आणि मला जरूरहि पडणार नाहीं. पण जर मी डॉक्टरनां सांगितलं तर मात्र डॉक्टर खात्रीनें–

मुक्ता : काय आपल्या नवऱ्याला न कळत तूं–

लता : होय, ज्याच्याकडून मी घेतले आहेत, त्याच्या भानगडीचा निकाल लावलाच पाहिजे, आणि तो सुद्धां यांना अगदीं न कळतां ! लावलाच पाहिजे मला निकाल !

मुक्ता : होय, मी नाहीं कां तुला सांगितलं पण –

लता : ( इकडे तिकडे फिरत ) बायकांपेक्षां पुरुषांना या गोष्टी बऱ्या साधतात बाई –

मुक्ता : होयच – म्हणूनच आपल्या पतीला सांग तूं सर्व –

लता : चल, भलतंच ! ( तिच्यासमोर उभी राहून ) काय ग, कर्जाची पैन् पै फेडून टाकली, म्हणजे आपला बॉंड परत मिळतो, होय ना ?

मुक्ता : हो, मिळालाच पाहिजे.

लता : आणि मग तो फाडून, तोडून, अगदीं जाळून टाकतां येतो होय, होय ना ?

**मुक्ता** : ( तिच्या तोंडाकडे रोखून पहाते. हातांतले कापडाचे तुकडे खालीं ठेवते, आणि उठून तिच्यासमोर उभी रहाते. ) लता, कांहीं तरी भयंकर गोष्ट छपवते आहेस तूं माझ्यापासून ?

**लता** : होय.

**मुक्ता** : कालपासून कांहीं तरी झालं आहे तुला, लता. सांग बघूं काय तें.

**लता** : ( तिच्या अगदीं जवळ जाऊन ) मुक्ता !– ( जिन्यावर पायांचा आवाज होतो व नंतर दारावर मारलेली थाप ऐकू येते. ) हे आले वाटतं. ( दरवाजा उघडायला जाते. )

**मुक्ता** : बरं तर. मी तुझ्या खोलींत बसतें शिवीत. अं ! तुझं मशीन पण तिकडेच आहे ना ? ( कापडाचे तुकडे व टेबलावरची कातर, सुईदोरा इत्यादि सामान एकत्र करून हातांत घेते, व उजव्या बाजूच्या खोलींत जाते. लतानें उघडलेल्या दरवाजांतून रमाकांत आंत येतो. )

**लता** : ( त्याची काठी व हॅट त्याच्या हातांतून घेऊन टेबलावर ठेवीत ) किती बरं वाटलं मला तुम्हीं आलांत ते !

**रमाकांत** : कां ? बरं नव्हतं वाटत तुला !

**लता** : तसं नव्हे, पण चैनच पडत नव्हतं सारा दिवस. केव्हां घरीं याल असं झालं होतं !

**रमाकांत** : आतां, आंत कोण ग गेलं तुझ्या खोलींत ?

**लता** : मुक्ता ती. माझा नवा ब्लाऊझ शिवायला बोलावली होती मी तिला.

**रमाकांत** : कसं कापड शोधून काढलं मी छान ?

**लता** : सांगितलं ना मी, कीं इकडच्या शिवाय तें जुळायचं नाहीं कुणाला म्हणून ? अगदीं नेहमीं मी इकडे आवडतं तसंच करतें कीं नाहीं ?

**रमाकांत** : अग लुच्चे, आपल्या नवऱ्याला आवडेल असं केलंस तर मोठं नवल वाटतं कीं काय तुला ? बरं पण, तुला बरंच काम

असेल शिवण्यासवरण्याचं ?

**लता** : कागद कसले आहेत एवढे ते कांखेंत ?

**रमाकांत** : कसले म्हणजे ? ऑफिसचे. उरकत नाहीं काम बुवा दिवसांत—पुरं केलं पाहिजे आतां.

( कागदासह आपल्या खोलीकडे जायला वळतो. )

**लता** : माझं एक काम आहे.

**रमाकांत** : काय बुवा ?

**लता** : तुमच्या चिमणीनं, अगदीं हळूच कानांत सांगितलं तर कराल ना गडे ?

**रमाकांत** : पण काय ते तर कळूं द्या पहिल्यानें.

**लता** : एवढं काम केलं तर, तुमची चिमणी अगदीं तुम्ही सांगाल ते कपडे घालील, सांगाल तशी नटेल, सांगाल ते करील !

**रमाकांत** : अरे, पण स्पष्ट बोलना काय तें—

**लता** : खरंच, रोज पेटी वाजवून दाखवीन, सांगाल तें गाणं म्हणेन—

**रमाकांत** : लता, त्या रामनाथच्या जागेसंबधीं सकाळीं बोललीस, तें तर नाहीं ना ?

**लता** : तेंच गडे !

**रमाकांत** : एवढी कपाळफोड केली असतांना मी, पुन्हां धैर्य तरी कसं होतं तुला तो विषय काढायला ?

**लता** : होय, होय गडे, एवढं ऐकलंच पाहिजे माझं तुम्ही. रामनाथला राहूं दिलाच पाहिजे त्याच्या जागेवर.

**रमाकांत** : पण लता, त्याला काढून तुझ्या मुक्तासाठीं जागा करणार आहे मी.

**लता** : तें खरं, पण दुसऱ्या एखाद्या माणसाला काढून टाकला तर रामनाथा ऐवजीं—

**रमाकांत** : भलताच हट्ट धरून बसली आहेस तूं ! त्याच्यासाठीं रदबदली

करण्याचं तूं त्याला विचार केल्याशिवाय वचन दिलंस, म्हणून मी त्याला—

**लता :** तसं नव्हे गडे, तुमच्याचसाठीं मी एवढा हट्ट धरते आहे· तुम्हींच नाहीं का मला सांगितलं, कीं हा मनुष्य फार भयंकर आहे; आणि तो एखाद्यावर उलटला म्हणजे नाहीं नाहीं त्या घाणेरड्या कंड्या त्या माणसांविषयीं पिकवीत सुटतो म्हणून ! काय करील नि काय नाहीं तो तुम्हांला, त्याचा नेम नाहीं. माझ्या छातींत तर धडकीच भरते बाई.

**रमाकांत :** हां, आलं लक्षांत. मागच्या आठवणी येऊन तूं एवढी भ्याली आहेस.

**लता :** म्हणजे ? कसल्या आठवणी ?

**रमाकांत :** साहाजिकच तुला तुझ्या वडिलांच्या त्या भानगडीची आठवण झाली असेल.

**लता :** होय. खरंच. तीच आठवण झाली मला. त्यांनीं असंच कुणालासं काढून टाकलं होतं आपल्या डिपार्टमेंटमधून, आणि त्या दुष्ट माणसानं काय काय घाणेरडे आरोप केले होते त्यांच्यावर ! वर्तमान पत्रांतून सुद्धां बोभाटा झाला होता त्याचा. बाबांना राजिनामाच द्यावा लागला असता, पण तुम्हीं त्या वेळेला खटपट केलीत म्हणून बचावले बाबा.

**रमाकांत :** तें खरं लता, पण तुझ्या वडिलांची गोष्ट निराळी होती आणि माझी गोष्ट निराळी आहे. तुझ्या वडिलांची अधिकाराच्या जागेवरची वर्तणूक अगदींच असावी तितकी चोख नव्हती— माझी गोष्ट तशी नाहीं. माझ्याविषयीं ब्र काढायची कुणाची छाती नाहीं. आणि जिवंत जीव असेपर्यंत माझी अशीच पत राहील, अशी खात्री आहे माझी.

**लता :** तुम्हांला कल्पना नाहीं गडे, अशा तऱ्हेचीं माणसं काय करतील आणि काय नाहीं त्याची. आपल्या या भरल्या संसारावर,—इकडच्या, माझ्या आणि आपल्या बाळांच्या सुखाच्या

संसारावर, कसल्याच—अगदीं कसल्याच - दुःखाची छाया पडतां कामा नये गडे!—म्हणून मी इतकी जीव तोडून इकडची विनवणी करतें.

**रमाकांत** : आणि तूं त्याच्यासाठीं रदबदली करते आहेस, म्हणूनच त्याला मुळींच ठेवतां येत नाहीं! मी रामनाथला काढून टाकणार ही गोष्ट ऑफिसांत आतां सर्वांच्या तोंडीं झाली आहे. आणि तूं सांगतेस तसं केलं, तर जिकडे तिकडे बभ्रा होईल कीं नव्या मॅनेजरसाहेबांनीं बाईलबुद्धीला बळी पडून आपला बेत रहित केला.

**लता** : मग, काय झालं लोक तसं म्हणाले तर?

**रमाकांत** : छे, छे, कांहींच नाहीं! फक्त या हट्टी चिमणीचा हट्ट पुरा झाला! माझ्या हाताखालच्या माणसांसमोर स्वतःला मी हास्यास्पद करून घेईन, असं तुला वाटतं?—वशिला लावला कीं स्वारीकडून काय वाटेल तें करून घ्यावं, असं लोकांना मी म्हणूं देईन होय? सर्व ऑफिसांत असल्या वर्तनाचा परिणाम काय होईल याची कल्पना नाहीं तुला!—आणि मी मॅनेजर असतांना तर रामनाथला ऑफिसांत मुळींच राहूं देतां येत नाहीं, याला दुसरं एक कारण आहे.

**लता** : म्हणजे?

**रमाकांत** : तसंच असतं तर एक वेळ त्याच्या मागच्या नैतिक अधःपाताकडे मी काणाडोळा केला असता.

**लता** : खरंच केला असतां तुम्हीं! होय ना?

**रमाकांत** : आणि तसा तो आपल्या कामांतहि हुशार आहे, पण माझी आणि त्याची शाळेपासूनची ओळख. लहानपणीं वाटेल त्याच्याशीं आपण मैत्री करतों, आणि मग असं भोवतं तें पुढच्या आयुष्यांत! स्पष्टच सांगतों तुला. याची आणि माझी खरोखरच एकदां दाट मैत्री होती. पण त्याचा हा भलताच फायदा घेतो आतां. वाटेल त्या लोकांसमोर माझ्या खांद्यावर हात टाकतो,

आणि ऑफिसांत तरी काय ? 'अरे ए रमाकांत, इकडे ये ना बेट्या !' असल्या सलगीच्या शब्दाशिवाय बात नाहीं ! खरो-खरच असं वाटतं मला तेव्हां ! ऑफिसांत मला राह्यला नको, तो असला तर !

**लता** : मला नाहीं वाटत तुम्हांला खरोखर वाटतं असं !

**रमाकांत** : काय ?—कां नाहीं ?

**लता** : इश्श !—कारण तसं वाटणं म्हणजे मनाचा क्षुद्रपणा आहे अगदीं.

**रमाकांत** : काय ? काय म्हणतेस तूं ? —मनाचा क्षुद्रपणा आहे ? म्हणजे मी क्षुद्र मनाचा आहे, असं तुझं मत ?

**लता** : मुळींच नाहीं. अगदीं त्याच्या उलट आहे गडे. आणि म्हणूनच इतका हट्ट धरतें आहें मी.

**रमाकांत** : बरं बरं. त्यांचा अर्थ तोच. मी अगदीं क्षुद्र मनानें विचार करतों नाहीं ? बरं तर मी तसाच आहे असं समज. मनाचा क्षुद्रपणा ! अच्छा ! —आतांच निकाल लावतो त्याचा. ( उजव्या खोलीच्या दाराकडे जाऊन ) भिमा, ए भिमा !

**लता** : म्हणजे ? करणार तरी काय तुम्ही ?

**रमाकांत** : ( ऑफिसचे कागद चाळून त्यांत पहात ) निकाल लावणार याचा. ( भिमा येते ) हें बघ भिमा, —( कागदांतून एक लिफाफा काढतो. त्यांतून एक पत्र काढून त्यांवर कांहीं लिहितो. पुन्हां लिफाफ्यांत घालतो व फाऊंटन पेननें लिफाफ्यावर पत्ता लिहितो. पत्र भिमाकडे देत ) हें पत्र घे आणि आत्ताच्या आत्तां खालीं जा. आणि रामाला म्हणावं त्या तिथें ते रामनाथ रहातात, माहीत आहे ना त्याला; त्यांना हें पत्र देऊन दे आत्तांच्या आत्तां. ( पत्र तिच्या हातांत देतो )

**भिमा** : जी साहेब. ( भिमा जाते )

**रमाकांत** : ( कागद गोळा करीत ) काय, कसं काय, लताबाई ! झाला का हट्ट ?

**लता** : ( भेदरून श्वासहि नीट न घेतां ) काय, काय होतं त्या पत्रांत ?

**रमाकांत** : रामनाथाला काढून टाकल्याची ऑर्डर.

**लता** : बोलवा, बोलवा, एकदम भिमाला मागें बोलवा, गडे. अजून वेळ गेली नाहीं. खरंच गेली नसेल ती खालीं अजून. —माझ्यासाठीं—माझ्यासाठीं—नाहीं, नाहीं इकडच्या जीवासाठीं— आपल्या लाडक्या बाळांसाठीं तरी बोलवा तिला परत. ( त्याला हालवून ) काय म्हणतें मी ऐकलं कां ? घ्याच तें पत्र परत गडे. कल्पना नाहीं तुम्हांला, त्या पत्रामुळें आपल्या संसाराची काय दशा होईल ती ?

**रमाकांत** : गेली ती वेळ आतां.

**लता** : ( एकदम गळाल्यासारखी होऊन ) होय, गेली वेळ आतां.

**रमाकांत** : लता, लाडके, तुला काळजी वाटते, तें समजतं मला. म्हणूनच तूं जरी मघाशीं माझा इतका अपमान केलास, तरी मनापासून मी तुला क्षमा करतों आहें. हो, अपमान नाहीं तर काय ? एक कंगाल खर्डेघाशा माझ्यावर सूड उगवील म्हणून मी भिऊन वागावं, असं सांगणं म्हणजे माझा अपमान नाहीं तर काय ? तरी पण क्षमा करतों मी तुला. मला माहीत आहे, माझ्या लताचं माझ्यावर फार फार प्रेम आहे; म्हणूनच तिनं तसं केलं मघाशीं. ( तिला जवळ घेतो. ) पण तुझं माझ्यावर इतकं प्रेम आहे तें बरोबर आहे गडे. काय व्हायचं असेल तें होवो. प्रसंगच आला तर तसल्याहि प्रसंगाला तोंड देण्याचा खंबीरपणा आहे माझ्या अंगांत. दिसेल तुला तेव्हां, सर्व जबाबदारी माझ्या डोक्यावर घ्यायला मी आहे कीं नाहीं समर्थ ?

**लता** : ( अंगावर शहारे आल्यासारख्या स्वरांत ) म्हणजे—म्हणजे ?

**रमाकांत** : म्हणजे, अगदीं अक्षरशः जें म्हणालों तेंच—

**लता** : ( भानावर येऊन ) पण इकडे तसं करावंच लागणार नाहीं.

**रमाकांत** : आतां कशी बोललीस. आलीच कसली जबाबदारी, तर

आपण दोघंहि समभागी होऊं त्यांत, लता. पतीपत्नींचं कर्तव्यच आहे तें. समजलं ? ( तिच्या पाठीवर हात फिरवीत ) झालं तुझं समाधान आतां ? बघ–बघ–आतां–अजून काय असे भेदरल्यासारखे डोळे करतेस ? भलतीच कांहीं भयंकर कल्पना करून घेऊन घाबरून गेली आहेस तूं !–जा, जा, उद्यां गाणं म्हणायचं आहे ना तुला पार्टींत ? किती दिवसांत गाणं म्हटलं नाहींस तूं ! पेटी घेऊन प्रॅक्टीस कर जा; जा, नाहीं तर फजिती होईल हां उद्यां सर्व बायकांपुढें. –मी दार लावून बसतों माझ्या खोलीचं. संपवलेच पाहिजेत मला हे कागद आजच्या आज. कुणालाही त्या बाजूला येऊं देऊं नको हं !( तिच्याकडे बघून मान हालवतो. आपले कागद उचलून घेतो. खोलींत जातो. आणि खोलीचा दरवाजा आंतून लावून घेतो. )

**लता :** ( चिंताग्रस्त होऊन गोंधळून गेली आहे. जणुं काय, जागेवरून हालतां येत नाहीं अशी स्थिति होऊन जागच्या जागीं उभी आहे. हलक्या आवाजांत ) होय. म्हटलं तसं करील तो.–करीलच तो–कांहीं झालं तरी शेवटीं करीलच तो तसं.–नको नको, देवा, कध्धीं नको होऊं दे तसं ! दुसरं कांहींही होवो, पण तें नको–कुणीतरी सुचवा हो मार्ग मला यांतून.

( दारावर थाप ऐकूं येते. लता दचकते. डॉ. संत आंत येतात. )

**लता :** या डॉक्टर. मला वाटलंच तुम्हीं म्हणून.–बसा. फार कामांत आहेत. मुलांना सुद्धां त्या बाजूला येऊं देऊं नकोस, म्हणून सांगून अगदीं घट्ट दरवाजा लावून बसले आहेत.

**डॉक्टर :** तूंहि नाहींस ना फार कामांत ?

**लता :** छे छे, डॉक्टर, तुमच्याबरोबर बोलत बसायचं मी कधीं टाळलं आहे कां ?

**डॉक्टर :** नाहीं नाहीं, आणि मलाहि आतां जितकं बोलतां येईल तितकं तुझ्याबरोबर बोलून घेतलं पाहिजे.

**लता :** म्हणजे ? जितकं बोलतां येईल तितकं म्हणजे ?

**डॉक्टर :** कां, घाबरलीस वाटतं ?

**लता :** मोठे चमत्कारिक शब्द वापरलेत तुम्हीं ? कां, कांहीं होणार आहे कीं काय ?

**डॉक्टर :** छेः विशेष कांहीं नाहीं. ज्याच्यासाठीं इतके दिवस मी मनाची तयारी करून ठेविली होती, तेंच. पण तें इतक्या लवकर होणार आहे, असं मात्र मला खात्रीनं वाटत नव्हतं.

**लता :** काय झालं आहे तुम्हांला डॉक्टर ? मला सांगितलंच पाहिजे तुम्हीं. ( कोचावर बसतात. )

**डॉक्टर :** झालं ! आमच्या अवतारसमाप्तीची वेळ आली. यापुढें आतां कांहीं उपाय राहिला नाहीं.

**लता :** ( श्वास टाकून ) तुम्हीं स्वतःसंबंधानं बोलता आहां होय ?

**डॉक्टर :** तर दुसऱ्या कुणासंबंधानं ? स्वतःलाच फसवण्यांत काय अर्थ आहे ? माझ्याकडून तपासून घ्यावयाला जे रोगी येतात, त्या सर्वांत अत्यंत केविलवाणी ज्याची स्थिति आहे, असा रोगी जर कुणी असेल, तर तो मी स्वतःच ! लता, हल्लीं हल्लीं मी स्वतःच्या प्रकृतीची अगदीं बारीक तपासणी चालविली होती, आणि शेवटीं आढावा घेऊन शिलकेला काय रहातं तें पहाणार होतों, तो काय-शिलकेच्या नावानं पार दिवाळं वाजलं आहे. बहुतेक आतां एक महिन्या-सव्वा महिन्याच्या आंत आमच्या अस्थी स्मशानभूमींतल्या किडेमुंग्या कुरतडत असलेल्या दिसतील.

**लता :** किती घाणेरडं बोलता आहां डॉक्टर !

**डॉक्टर :** आहेच तो रोग तसा घाणेरडा. आणि त्याहिपेक्षां भयंकर म्हणजे एकदांचा शेवट होईपर्यंत याहीपेक्षां किती तरी घाणेरड्या गोष्टी मला सहन कराव्या लागतील. आतां पुन्हां एकदा मी स्वतःची तपासणी करणार आहें. ती शेवटची तपासणी. त्यानन्तर मला बहुतेक खात्रीपूर्वक कळेल कीं, या कुजक्या शरीराची मृत्यूशीं शेवटची भयंकर धडपड केव्हां सुरूं होणार ती. हो. मला कांहीं सांगायचं आहे तुला. रमाकांताचं मन आहे निर्मळ आणि नाजुक. कुठलीही धाणेरडी गोष्ट पाहिली कीं, त्याला अगदीं मना-

पासून किळस येते. माझ्या शेवटच्या दुखण्यांत त्यानं मुळींच माझ्याजवळ येतां कामा नये.

**लता** : पण डॉक्टर–

**डॉक्टर** : छे, छे. मी त्याला मुळींच येऊं देणार नाहीं तिथं. अगदीं कांहीं झालं तरी, तशा स्थितींत माझा दरवाजा त्याला साफ बंद ! माझी अगदीं खात्री झाली कीं, तो भयंकर शेवटचा क्षण आतां अगदीं जवळ आला म्हणून, कीं माझ्या व्हिजिटिंग कार्डावरती मी एक काळी फुली मारून ते तुम्हांला पाठवून देईन. मग तुम्हीं समजा, कीं आमच्या आयुष्याच्या नाटकाच्या शेवटच्या अंकांतला तो शेवटचा भयंकर प्रवेश सुरू झाला म्हणून !

**लता** : आज अगदीं कांहीं तरी बोलतां आहां तुम्ही, डॉक्टर. तुम्ही आज अगदीं आनन्दांत इथ बोलत बसावं अशी माझी फार इच्छा होती.

**डॉक्टर** : खांद्यावर हात टाकून प्रत्यक्ष मृत्यू माझ्याजवळ उभा असतांता मी आनन्दांत असावं होय ? आणि हें सर्व कां ? तर दुसऱ्या एका माणसानं केलेलीं पापं निस्तरण्याकारितां ! काय न्याय आहे. आणि दरएक कुटुम्बांत या असल्या न्यायाची फळं कुणी ना कुणी तरी एक भोगीत आहे.

**लता** : ( स्वतःच्या कानांवर हात ठेवून ) कांहीं तरी ! –दुसरं कांहीं तरी चांगलसं आनन्दाचं बोला, डॉक्टर.

**डॉक्टर** : हात्तिच्या ! हें सर्व मी बोलतों आहे, हें तरी काय ? हें सर्व हंसण्यासारखंच आहे. आमच्या वडिलांनीं आपल्या तरुणपणीं वेडेचार केले, नाना चाळे करून मजा मारली, त्याचे परिणाम मात्र माझ्या या निरपराध पाठीच्या कण्याला भोगावें लागताहेत.

**लता** : म्हणजे, तुमचं म्हणणं हेंच कीं, त्यांना नाना तऱ्हेचीं व्यसनं होतीं, आणि खाण्यापिण्यांत वगैरे ते अगदीं बेछूट होते, होय ?

**डॉक्टर** : होय, पिण्यांत तर फारच ! रोज निरनिराळया तऱ्हेच्या उंची उंची बाटल्या एकामागून एक ते खलास करीत असत.

लता : अरेरे ! त्यांनीं मजा मारली, त्याचे हे असे परिणाम तुम्हांला भोगावे लागताहेत, हें खरोखरच भयंकर आहे.

डॉक्टर : हो, आणि त्यांतल्या त्यांत फार भयंकर म्हणजे जिव्हेनें स्वाद चाखला त्यांच्या आणि कणा पोखरला जातो आहे माझ्या पाठीचा !

लता : होय, तेंच तर फार भयंकर.

डॉक्टर : ( तिच्याकडे रोखून पाहून ) हूं !

लता : ( जरा वेळ थांबून ) तुम्हीं हंसलातसे ?

डॉक्टर : मी ?—तूंच हंसलीस.

लता : नाहीं नाहीं. तुम्हींच हंसल्यासारखं केलंत, डॉक्टर.

डॉक्टर : ( उठून उभे रहातात. इकडे तिकडे फिरत ) मला वाटलं त्यापेक्षां तूं बरीच लबाड आहेस अं !

लता : मला आज कांहींतरी वाटतं आहे !

डॉक्टर : दिसतं खरं तसं.

लता : डॉक्टर, डॉक्टर, खरंच तुम्हीं यांना आणि मला सोडून जाणार ?

डॉक्टर : उंः ! थोड्या दिवसांनीं तुम्हांला याचं कांहींच वाटणार नाहीं. एकदां कायम निघून गेलेल्या माणसांचा लगेच विसर पडतो.

लता : ( काळजीनें भरलेल्या नजरेनें त्यांच्याकडे पहात ) खरंच असं वाटतं तुम्हांला ?

डॉक्टर : माणसांना काय—दुसरे मायापाश जडतात. आणि मग—

लता : कुणाला दुसरे मायापाश जडतील ?

डॉक्टर : मी गेल्यावर ना ?—रमाकांताला आणि तुला, दोघांनाहि. तुला तर दुसरे जडायला सुरुवात सुद्धां झालेली दिसते. त्या काल मुक्ताबाई आल्या होत्या, त्या कशाला आल्या होत्या इथं ?

लता : ओ हो ! डॉक्टर !—बिचाऱ्या मुक्तेचा मत्सर वाटतो कीं काय तुम्हांला ?

डॉक्टर : खरंच वाटतो. या घरांत माझ्या मागून माझी जागा तीच

चालवणार–माझा कारभार आटोपला, मग ही बाई–

लता : शूः डॉक्टर! फार मोठ्यानें बोलूं नका. ती त्या खोलींत आहे.

डॉक्टर : आज सुद्धां आली आहे का पुन्हां? पाहिलंस!

लता : माझा ब्लाउझ् शिवून द्यायला आली आहे ती बिचारी. छे छे, डॉक्टर कांहींच्या बाही बोलतां आहां तुम्ही आज–(बाजूच्या सोफावर बसते.) डॉक्टर, आतां चांगलं कांहीं तरी बोला पाहूं. उद्यां रायचंदसाहेबांकडे पार्टीला जायचं आहे ना आम्हांला, तिथं गायचं आहे मला बायकांत, बरं कां? पहा उद्यां कशी छान गातें ती मी! तुम्हीं सुद्धां येणार ना यांच्याबरोबर तिथं? ( टेबलावरची दागिन्याची पेटी उघडून त्यांतले निरनिराळे दागिने बाहेर काढीत) डॉक्टर, बसा ना इथं खुर्चीवर. दाखवतें तुम्हांला मी उद्यां काय काय घालणार आहे तें.

डॉक्टर : ( बसत ) काय? काय?

लता : काय कशा आहेत?

डॉक्टर : मोत्यांच्या बांगड्या वाटतं?

लता : किती सुंदर डिझाइन आहे, नाहीं? किती काळोख पडला आहे आज, पण उद्यां इथं–हं डॉक्टर, अगदीं बारकाईनेंसे पहातां आहां माझ्या हाताकडे?

डॉक्टर : हुंः!

लता : कां, इतका अगदीं विचार कसला करतां आहां? माझ्या हातांना बरोबर होणार नाहींत वाटतं त्या?

डॉक्टर : हात तपासल्याशिवाय तें मी कसं सांगूं?

लता : ( क्षणभर त्यांच्याकडे पहात ) इश्श, डॉक्टर, ( बांगड्या पुन्हां डब्यांत ठेवीत ) चला, मी नाहीं दाखवीत तुम्हांला.

डॉक्टर : हं, आतां आणखी काय दाखवणार आम्हांला?

लता : चावट आहांत तुम्ही! आतां कांहीं एक दाखवणार नाहीं तुम्हांला! ( दागिन्याच्या पेटींत दागिने इकडे तिकडे करीत

स्वतःशींच कांहीं तरी गुणगुणते. )

डॉक्टर : ( थोडा वेळ स्वस्थ राहिल्यानंतर ) तुझ्याशीं इतक्या मनमोकळेपणानें जेव्हां जेव्हां बोलत बसतों तेव्हां, असं वाटतं कीं, या घराचा आणि माझा जर संबंध जडला नसता, तर माझं काय झालं असतं कुणाला ठाऊक !

लता : ( स्मित करीत ) पण आमच्या इथं तुम्हांला अगदीं घरासारखं वाटतं ना ?

डॉक्टर : ( समोर शून्यपणें पहात; हलक्या आवाजांत ) आणि आतां हें सर्व सोडून जायचं–

लता : कांहीं तरी बोलूं नका डॉक्टर. कांऽहीं सोडून जात नाहीं तुम्ही !

डॉक्टरः ( त्याच आवाजांत ) नुसतं सोडून जायचंच नव्हे तर मागें आपली कृतज्ञतापूर्वक कुणी आठवण काढील असं कांहीं ठेवूनहि जायचं नाहीं. अंः ! कांहीं नाहीं ! कुणीहि यावं आणि माझी रिकामी झालेली जागा भरून काढावी.

लता : पण डॉक्टर, मी तुमच्याकडे कांहीं आतां–पण नकोच !

डॉक्टर : काय ?

लता : तुमच्या स्नेहाचा पुरावा म्हणून कांहीं–

डॉक्टर : बोल, बोलना.

लता : माझ्यासाठीं कांहीं मोठ्ठं–फार मोठ्ठं काम–

डॉक्टर : बोल बोल. एकदां तरी मला सुखी असं वाटेल.

लता : पण, तुम्हांला माहीत नाहीं अजून काय आहे तें.

डॉक्टर : नाहीं, पण सांग ना.

लता : छेः, नाहीं सांगता येत मला, डॉक्टर. अगदीं तें कांहींच्या कांहींच आहे ! तें करायचं म्हणजे तुम्हीं मला चांगलाच सल्ला दिला पाहिजे–मदत केली पाहिजे–माझं मोठ्ठंच काम केलं पाहिजे !

डॉक्टर : जितकं मोठं असेल तें काम तितकं बरं वाटेल मला. पण

तुझ्या मनांत आहे तरी काय ? कल्पना होत नाहीं मला. सांग ना मला. इतका विश्वास नाहीं माझ्यावर तुझा ?

**लता** : दुसऱ्या कुणावर नाहीं इतका तुमच्यावर आहे, डॉक्टर. मला माहित आहे तुमच्या सारखं प्रामाणिक आणि सरळपणं माझ्याशीं वागणारं, माझ्या स्नेहाचं दुसरं कुणीच नाहीं. आणि म्हणूनच मी तुम्हांला सांगणार. हें पहा डॉक्टर, कांहीं एक गोष्ट घडणार आहे. ती न घडेल असं मी करतें आहें. तुम्हीं मदत केली पाहिजे मला त्यांत. तुम्हांला माहीत आहे ना, यांचं कित्ती कित्ती प्रेम आहे माझ्यावर तें ? माझ्यासाठीं प्राण द्यायचा प्रसंग आला तरी इकडे तो द्यायला कमी करणार नाहींत.

**डॉक्टर** : ( पुढें वांकून ) लता, एकट्या रमाकांताचंच तुझ्यावर इतकं प्रेम आ ?

**लता** : ( दचकून ) आं ! एकट्या ?

**डॉक्टर** : होय, एकटा तोच तुझ्यासाठीं प्राण देईल असं तुला वाटतं ? दुसरं कुणी नाहीं ?

**लता** : ( खिन्नपणें ) असं आहे काय ?

**डॉक्टर** : होय, माझा अगदीं निश्चय झाला होता कीं, हें जग सोडून जाण्यापूर्वी तुला माझं मन समजलंच पाहिजे. आणि तें सांगायला आतांसारखी दुसरी वेळ येणं शक्यच नव्हतं; समजलं ना आतां लता ? आतां तरी माझ्यावर वाटेल तो विश्वास टाकायला कांहीं हरकत नाहीं अशी तुझी खात्री झाली असेल.

**लता** : (शांतपणें, निश्चयी चेहरा करून उठते) बाजूला व्हा डॉक्टर, जाऊं द्या मला.

**डॉक्टर** ( तिला वाट देण्याकरितां मागें होतात, पण तसेच बसून रहातात. ) लता !

**लता** : ( खोलीच्या दरवाजाकडे जाऊन ) भिमा, अग ए भिमा, काळोख किती झाला ! दिवे लावायचे नाहींत ? ( दिवाणखान्यां-

तले सर्व दिवे स्वतः चक्क लावते. परत कोचाकडे येऊन ) डॉक्टर, डॉक्टर, किती वाईट बोललांत तुम्ही !

**डॉक्टर** : दुसऱ्या कुणाइतकं मीही तुझ्यावर प्रेम केलं, तें वाईट केलं होय ?

**लता** : तें जाऊं द्या, पण उघड उघड माझ्या तोंडावर स्पष्ट तसं बोलायची काय जरूर होती त्याची ?

**डॉक्टर** : म्हणजे ? तुला कल्पना होती कीं काय त्याची ? अं, लता, सांग मला. होती कल्पना तुला ?

**लता** : मला ! काय माहित मला होती कीं नाहीं तें ! मला वाटत नव्हती—नाहीं—मला नाहीं कांहीं समजत—इतके वेडगळ तुम्ही असाल असं मला नाहीं वाटलं, डॉक्टर ! किती मजेंत बोलत होतों आपण ?

**डॉक्टर** : बरं, तें जाऊं दे. पण आतां तर तुझी खात्री आहे ना, कीं माझ्याकडून वाटेल तें करून घ्यायला तुला कांहीं हर-कत नाहीं म्हणून ? मग आतां बोल ना काय तें ?

**लता** : ( त्याच्याकडे पहात ) हें इतकं सर्व झाल्यावरही ?

**डॉक्टर** : खरंच, हात जोडून सांगतों पाहिजे तर, कीं सांगच मला तुला काय बोलायचं होतं तें.

**लता** : छे, छे. आतां तुम्हांला मला कांहींच सांगतां येणं शक्य नाहीं.

**डॉक्टर** : तें खरं. पण एवढी भयंकर शिक्षा मला करूं नकोस. दुसरा कोणीही तुझ्यासाठीं जें करूं शकेल, तें तरी मला करायला सांग.

**लता** : अहं ! यापुढें तुम्हीं माझ्यासाठीं कांहींही करतां कामा नये. आणि दुसरं म्हणजे खरोखरच मला कुणाचीच मदत नको आहे. आपल्या कांहीं तरी कल्पना माझ्या डोक्यांत येत होत्या झालं. कांहींतरीच नाहीं तर काय ! ( कोंचाच्या एका टोंकावर बसते. ) डॉक्टर, तुम्ही इतके चांगलें माणूस आहां !—आतां या चक्क उजे-

डांत तुम्हांला स्वतःचीच लाज वाटत असेल नाहीं ?

**डॉक्टर** : मुळींच नाहीं. बरं पण मी जावं हें बरं. कायमचंच जावं.

**लता** : छे, छे. डॉक्टर, तसं नव्हे. तुम्हीं अगदीं पहिल्यासारखे इथं या जा. यांचा तुमच्याशिवाय एक क्षणही जात नाहीं, माहीत आहे ना तुम्हांला ?

**डॉक्टर** : आणि तूं ?

**लता** : वाः ! तुमच्या येण्यांत मलाहि खूप आनन्द होतो, डॉक्टर.

**डॉक्टर** : हेंच तें ! या असल्या बोलण्यांनींच माझी तुझ्याविषयीं कांहीं तरी कल्पना होते. खरंच, तूं म्हणजे एक कोडं आहेस. मला किती तरी वेळां वाटे, कीं रमाकांताशीं बोलत बसण्यांत तुला जितका आनन्द होतो, तितकाच माझ्याशींहि वागतांना होतो.

**लता** : खरं आहे थोडसं, —हें पहा, कांहीं माणसांवर खूप प्रेम करावसं वाटतं, तर कांहीं माणसं बोला--बसायला नेहमींच आपल्या-जवळ असावीं असं वाटतं.

**डॉक्टर** : तूं म्हणतेस त्यांत आहे खरं थोडं तथ्य.

**लता** : मी माहेरीं होतें ना, तेव्हां बाबांवरही माझं खूप प्रेम होतं. पण खरं सांगूं कां ? आमच्याकडे सैपाकाला दोन बाया होत्या, त्यांच्यांत जाऊन तासचे तास बोलत बसायला मला मोठी मजा वाटत असे. कारण एवढंच कीं, त्या कधींहि हें असं आहे आणि तें तसं आहे, अशा मोठमोठ्या तत्वांच्या बढाया मारीत बसत नसत. काय आपल्या अनुभवाच्या एक एक गोष्टी सांगायच्या त्या छान !

**डॉक्टर** : अस्सं ? समजलं. त्या दोन बायांची जागा मी भरून काढली आहे वाटतं, तूं इथं आल्यावर ?

**लता** : ( एकदम उठून ) नाहीं, नाहीं डॉक्टर, असं काय ? माझ्या बोलण्याचा अर्थ तसा नव्हता. पण एवढं तर तुम्हांला समजतं ना, कीं यांच्याशीं बोलायचं म्हणजे बाबांशीं जसं बोलावं लागत असे मला, तसंच बोलावं लागतं.

( दरवाजाशेजारच्या खिडकींतून रामनाथ वर येतांना दिसतो दारावर खट खट आवाज होतो. )

लता : कोण आहे ?

( बाहेरून रामनाथचा आवाज–मी आहें. )

लता : अगबाई ! शिंपी आला वाटतं.

डॉक्टर : मग इतकी घाबरलीस कां ?

लता : छे, छे. घाबरलें कुठें ? –तें हें– तो नंवा ब्लाऊझ घेऊन आला वाटतं.

डॉक्टर : काय ब्लाऊझ ? ती तुझी मैत्रीण नवा ब्लाऊझ शिवायला आली आहे ना ?

लता : हो, होय. पण दुसरा एक आणायला सांगितला होता मी शिंप्याला. यांना अगोदरच कळतां कामा नये कांहींएक ! सर्व उद्यांचे कपडे घालून पहाणार आहें मी आतां.

डॉक्टर : मग मी आंत जाऊं कीं काय ?

लता : होय तेंच. जा, जा. डॉक्टर, तुम्ही आंत खोलींत जा, आणि कांहीं तरी गोष्टी काढून शक्य तितका वेळ हे आंतच रहातील असं करा.

डॉक्टर : अंः एवढंच ना ? वाटेल तितका वेळ रमाकांताला थोपवून धरतों मी खोलींत. माझ्याकडे लागलं तें–उद्यां एकदम दिपवायचा विचार आहे वाटतं रमाकांताला. अच्छा.

( रमाकांताच्या खोलींत जातात व दरवाजा लावून घेतात. लता हळूंच रमाकांताच्या खोलीची बाहेरची कडी लावते व जाऊन दार उघडते. रामनाथ आंत येतो. )

लता : ( स्वतःशीं ) होणार, शेवटीं होऊं नये तें होणार– जंग जंग पछाडलें, तरी शेवटीं तें होणारच ! –नाहीं, नाहीं, नाहीं ! शक्य नाहीं तसं होणं– मुळींच होणार नाहीं तसं !

लता : हळूं बोला. ते घरांत आहेत.

रामनाथ : घरांत असो कीं नसो, मला कांहींच नाहीं तें !

लता : काय पाहिजे तुम्हांला ?

**रामनाथ :** एक गोष्ट स्पष्ट करून तुम्हीं सांगितली पाहिजे मला.

**लता :** काय तें ? बोला लवकर.

**रामनाथ :** आत्तांच मला काढून टाकल्याचं पत्र मिळालं, हें मला वाटतं तुम्हांला माहीत असेलच.

**लता :** माझा नाइलाज झाला, रामनाथ. तुमची नोकरी जाऊं नये म्हणून जंग जंग पछाडलें मी. पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं त्याचा.

**रामनाथ :** तुमच्या पतीचं तुमच्यावर एवढंसुद्धां प्रेम नाहीं, तर मग ? मी तुमची जगांत काय नाचक्की करूं शकेन, हें माहीत असूनसुद्धां त्यानं—

**लता :** त्यांना माहीत असेल तें, असं तुम्हांला वाटतं तरी कसं ?

**रामनाथ :** खरंच नाहीं मला वाटत तसं. सर्व कांहीं कळत असून सुद्धां छातीठोकपणें स्वतःवर जबाबदारी घेऊन मला टक्कर द्यायची हिम्मत आमच्या रमाकांतबुवाच्या अंगांत असेल, असं मला नाहीं वाटत !

**लता :** हें पहा जरा आदरपूर्वक बोला माझ्या पतिविषयीं.

**रामनाथ :** खात्रीनें. किती पाहिजे तितका आदर आहे माझ्या मनांत. तें असो. पण तुमचं हें गुपित तुम्ही कुणालाच सांगत नाहीं आहां, त्याची कालच्यापेक्षां आज जरा जास्त स्पष्ट कल्पना आली आहे कां तुम्हांला ? तुम्हीं काय करून बसलां आहां माहीत आहे तुम्हांला ?

**लता :** तुम्ही कधींच देऊं शकलां नसाल इतकी स्पष्ट कल्पना आहे मला.

**रामनाथ :** मला काय माहिती आहे कायद्याची म्हणा !

**लता :** तुम्हांला पाहिजे तरी काय माझ्याकडून ?

**रामनाथ :** तुम्हीं आहांत तरी कशा, हें पाह्यचं आहे मला. सबंध दिवस मी तुमच्यासंबंधीं विचार करतों आहें.—माझ्यासारख्या एका क्षुल्लक खर्डेघाशाला—एका—बोलूंच कां ?—एका गुन्हेगाराला

सुद्धां, ज्याला अंतःकरण आहे असं कांहीं म्हणतात तें थोडंसं आहे, समजलं ?

**लता :** आहे ना तुम्हांला अंतःकरण ? मग माझ्या चिमण्या बाळांचा तरी विचार करा.

**रामनाथ :** तुम्हीं आणि तुमच्या पतीनें माझ्या बाळांचा केला आहे का विचार ?—तें जाऊं द्या. मला एवढंच सांगायचं आहे तुम्हांला, कीं या गोष्टीसंबंधानें तुम्हांला विशेष घाबरायचं कांहींच कारण नाहीं. पहिली गोष्ट म्हणजे अशी, कीं मी स्वतः होऊन तुमच्यावर कांहींच आरोप घालणार नाहीं.

**लता :** मला वाटलंच तुम्ही तसं करणार नाहीं म्हणून.

**रामनाथ :** या सर्व भानगडीचा गोडीगुलाबीनं निकाल लावतां येईल. दुसऱ्या तिसऱ्याला या भानगडीचा मागमूसहि लागण्याची कांहीं जरुर नाहीं. आपणां तिघांतच हें गुपित राहील.

**लता :** छे, छे. यांना यातलं कांहींच कळतां कामा नये.

**रामनाथ :** तें कसं शक्य होईल तुम्हांला ? म्हणजे, राहिलेली सर्व बाकी तुम्ही चुकती करूं शकतां होय ?

**लता :** नाहीं, सध्यां तें शक्यच नाहीं.

**रामनाथ :** मग, कांहीं युक्ती करून तेवढे पैसे उभे करणार तुम्ही कसे तरी ?

**लता :** कांहीं नाहीं युक्ती.

**रामनाथ :** पण कांहीं केलंत तरी त्याचा तुम्हांला कांहींच उपयोग होणार नाहीं आतां. तुम्हीं पैशांची गोणी आणून जरी माझ्यापुढें ओतलीत, तरी सुद्धां हातचा बाँड मी सोडणार नाहीं आतां !

**लता :** मग करणार काय तुम्हीं त्याचं ?

**रामनाथ :** तसाच माझ्याकडे राखून ठेवणार. ज्यांचा या भानगडींशीं कांहींच संबंध नाहीं त्यांना अर्थात् कांहींच दाद लागूं देणार नाहीं मी. म्हणून म्हणतों कीं, या भानगडीमुळें तुमच्या डोक्यांत जर भलताच कांहीं विचार आला असेल तर—

लता : खरंच आला आहे.

रामनाथ : समजा, तुमच्या मनांत या घरांतून तोंड घेऊन निघून जायचा विचार—

लता : तोच विचार आला होता माझ्या मनांत.

रामनाथ : किंवा स्वतःचं बरंवाईट करून घ्यायचा विचार–

लता : पण तुम्हांला कसं समजलं तें ?

रामनाथ : बहुतेक माणसांच्या मनांत तेंच येतं पहिल्यांदा. माझ्याहि मनांत आलं होतं, पण नाहीं झाली तेवढी हिंम्मत.

लता : ( अगदीं मंद आवाजांत ) आणि मलाहि नाहीं होत तेवढी हिम्मत.

रामनाथ : ( कांहीं तरी काळजींतून सुटल्यासारख्या स्वरांत ) होय ना ! बरोबर आहे. तुम्हांलाहि तेवढी हिम्मत ना–

लता : नाहीं नाहीं, मुळींच नाहीं.

रामनाथ : आणि पुन्हां, तुम्हीं तसं केलं असतं, तर कमालीचा मूर्खपणा झाला असता तो. एकदां पहिल्यांदा घरांत जें कांहीं वादळ होतं तें झाल्यावर मग सर्व कांहीं शांत आणि सुरळित होतं-- तुमच्या पतीसाठीं एक पत्र आणलं आहे मी.

लता : सर्व कांहीं कळवलं आहे त्यांत त्यांना ?

रामनाथ : जितक्या चांगल्या तऱ्हेनें आणि मन न दुखवितां सांगतां येण्यासारखं आहे, तितक्या चांगल्या तऱ्हेनं सांगितलं आहे.

लता : ( एकदम ) त्यांना मुळींच मिळतां कामा नये तें पत्र. फाडून तुकडे करा त्याचे. कांहींही युक्ति करून पैसे उभे करतें मी.

रामनाथ : माफ करा मला, पण मला वाटतं आत्तांच मी तुम्हांला सांगितलं कीं–

लता : तुमच्या बाकी राहिलेल्या पैशासंबंधीं नाहीं बोलत आहें मी. अमुक पैसे द्या, नाहीं तर गांवभर ही गोष्ट करीन असं सांगून किती रक्कम तुम्ही त्यांच्याकडे मागतां आहां, ती सांगा मला. कांहींही करून आणीन मी ती.

**रामनाथ** : एक पैहि मी मागत नाहीं तुमच्या नवऱ्याकडे.

**लता** : मग पाहिजे तरी काय तुम्हांला ?

**रामनाथ** : सांगतों. समाजांत मला वर यायचं आहे; आणि या बाबतींत मला तुमच्या पतीनं साहाय्य केलंच पाहिजे. गेलीं किती तरी वर्षें माझ्या हातून कसलाच अप्रामाणिकपणा घडलेला नाहीं आणि तरी पण माझ्या वर यायच्या सतत चाललेल्या धड-पडीला विशेषसं मुळींच यश आलेलं नाहीं. आतांसा कुठें माझा जम बसून हळू हळू मी वर येत होतों, तों लाथ मारून पुन्हां मला तुमचा नवरा खालीं ढकलूं पहात आहे. नाहीं, आतां नुसती आहे त्याच जागेवर मला पुन्हां ठेवण्याची तेवढीहि मेहेरबानी करून माझी शांतता होणार नाहीं. सांगितलंच मीं तुम्हांला, कीं मला वर यायचं आहे. नुसतं मला ऑफिसांत राह्यचं आहे, इत-कंच नव्हे, तर आहे त्यापेक्षांहि मोठी जागा मला हवी आहे. तुमच्या पतीनं स्वतःची जागा मला दिली पाहिजे, आणि–

**लता** : शक्यच नाहीं तें तसं करणं !

**रामनाथ** : करील तो. खात्री आहे माझी. ना म्हणण्याची छातीच नाहीं त्याची. आणि एकदां कां ऑफिसांत घडी बसली माझी, मग पहाल मजा ! एका वर्षाच्या आंत ऑफिसचा बडा साहेब होऊन बसेन मी. कंपनीचा मॅनेजर म्हणून रमाकांत नव्हे, तर रामनाथ मिरवेल.

**लता** : नशिबांत नाहीं तुमच्या तें !

**रामनाथ** : म्हणजे ? तुम्हीं–

**लता** : होय, होय; आली हिम्मत आतां माझ्यांत.

**रामनाथ** : ओहो. भेवडावूं शकणार नाहीं तुम्ही मला ! तुमच्या-सारखी लहानपणापासून सुखांत आणि लाडांत वाढलेली मुलगी–

**लता** : दिसेल, तुम्हांला दिसेल.

**रामनाथ** : कुठें ? त्या मागल्या विहिरींत वाटतं ? किती खोल, काळीकाभिन्न आहे ती माहित आहे तुम्हांला ? –आणि काय तें

हिडीस दिसतं शरीर मग ! विद्रूप चेहरा, वर गेलेले डोळे–

**लता** : भेवडावूं शकणार नाहीं तुम्ही मला.

**रामनाथ** : आणि तुम्हीहि भेवडावूं नका मला. बोलणं सोपं असतं, पण करणारीं माणसं फार थोडीं –आणि पुन्हां उपयोग काय त्याचा ? तुम्ही स्वतःचं कांहींहि केलंत तरी, तुमचा नवरा माझ्या तावडींतून थोडाच सुटणार आहे ?

**लता** : नंतरसुद्धां ? मी नाहींशी झाल्यावर—

**रामनाथ** : तुमची अब्रू माझ्या मुठींत आहे, हें विसरतां वाटतं तुम्ही ! ( निःशब्दपणें लता त्याच्या तोंडाकडे पहात उभी रहाते ) बरं आहे. मीं द्यायची ती सूचना दिली तुम्हांला. मूर्खपणाचं कृत्य कांहीं करूं नका. रमाकांताला माझं पत्र मिळालं, म्हणजे तो मला बोलावणं पाठवील अशी आशा आहे. आणि असलीं उलट्या काळजाचीं कामं पुन्हां एकदां करायला मला भाग पाडायला, तुमचा नवराच कारणीभूत होत आहे, हें मात्र कालत्रयीहि विसरूं नका. माझ्याकडून त्याला याबद्दल कधींहि क्षमा होणार नाहीं. बरं तर, येतों मी. ( जातो. )

**लता** : ( दरवाजाकडे वळते व ऐकत रहाते. ) चालला –पत्र नाहीं टाकीत तो पत्राच्या पेटींत. –नाहीं, नाहीं, नाहीं. शक्य-नाहीं तें. ( दरवाजाशेजारच्या खिडकीकडे वांकून पहाते. ) हें काय ? –उभा आहे तो तिथं–जिना उतरून गेला नाहीं अजून– टाकूं कीं न टाकूं असा विचार चालला आहे मला वाटतं त्याचा ! टाकील का तो–( पत्रांच्या पेटींत एक पत्र पडल्याचा आवाज होतो. *खिडकीकडून जिन्यावर गेलेलं कुणी तरी दिसतं. जिन्यावर* पायांचा आवाज खालीं जाईपर्यंत एकूं येतो. गळा कोंडल्याप्रमाणें लतेच्या तोंडून एक लहानशी किंकाळी येते. एकदम दरवाजाकडून धांवत येऊन ती कोचावर पडते. थोडा वेळ तशीच रहाते. )

**लता** : बाहेर पेटींत आहे तें ! ( हळूं उठून दरवाजाशेजारच्या खिडकींतून वांकून बाहेरच्या बाजूला पत्रांच्या पेटीकडे पहाते. )

तें तिथं आहे तें. —नाथ, नाथ ! झालं, संपलं !—आशेचा शेवटचा धागा तुटला ! घात—आतां आपणां दोघांचाहि घात झाला.

( मुक्ता उजव्या बाजूच्या खोलींतून बाहेर येते. )

मुक्ता : झाला बाई एकदां पुरा. लता, घालून बघ गडे.

लता : ( अगदीं बसलेल्या घोगऱ्या आवाजांत ) मुक्ता, जरा इकडे ये.

मुक्ता : ( हातांतला ब्लाऊझ कोचावर फेकून ) काय, झालं काय तुला ? पांढरी फटफटीत झाली आहेस तूं लता !

लता : इकडे ये ग जरा—पत्र दिसतं आहे तुला तें ? तिकडे पहा ग पेटीच्या कांचेंतून नाहीं कां दिसत तुला तें ?

मुक्ता : दिसतं आहे ना मला !

लता : रामनाथांचं आहे तें.

मुक्ता : लता ! तुला रामनाथांनीं पैसे कर्जाऊ दिले होते तर मग ?

लता : होय. आणि सगळं कांहीं आतां इकडे कळणार.

मुक्ता : एक गोष्ट तुला पुन्हां पुन्हां सांगतें, लता, कीं रमाकांतांना सर्व कळेल तर तुमचं दोघांचहि हित आहे त्यांत.

लता : तुला सगळं माहीत नाहीं ग. मीं एक खोटी सही केली आहे त्या कागदावर.

मुक्ता : अगबाई !—

लता : तुला एकच गोष्ट सांगून ठेवायची आहे. मुक्ता—तूं साक्षी राहिलं पाहिजेस माझ्यासाठीं.

मुक्ता : साक्षी ? म्हणजे काय करायचं मी ?

लता : समज, माझं डोकं फिरलं,—आणि आतां तें केव्हां फिरेल त्याचा नेम नाहीं.

मुक्ता : लता !—

लता : किंवा दुसरं कांहीं माझं झालं,—कांहींही समज—कांहीं होऊन मी इथून कायमची नाहींशी झालें—

मुक्ता : लता, लता,—आतां मात्र तुझं डोकं खास फिरलं आहे.

लता : आणि माझ्या या भानगडीची सर्व जबाबदारी स्वतःवर घ्यायला छातीठोकपणें कुणी पुढें आलं—यांतला सर्व दोष आपलाच आहे, असं कुणी म्हणायला लागलं—समजलं ना तुला कोण तें ?

मुक्ता : समजलं, लता, समजलं—पण तुला असं वाटतं तरी—

लता : तर—तर तूं माझी साक्षीदारीण म्हणून पुढें होऊन, त्या माणसाचा त्यांत कांहींच दोष नाहीं—सर्व—अगदीं सर्व जबाबदारी माझी—सर्वस्वीं माझी आहे असं सांगितलं पाहिजेस, समजलं ? नीट ध्यानांत ठेव—माझं डोकं मुळींच फिरलेलं नाहीं आतां. अगदीं साफ शुद्धीवर आहें मी. खरच, या भानगडीचं दुसऱ्या कुणाला एक अक्षरहि माहीत नाहीं. सगळं मीं केलं. राहील ना ध्यानांत ?

मुक्ता : राहील, राहील ग, लता. पण हें आहे काय सर्व, मला समजतच नाहीं !

लता : कस समजाव तुला ? अलौकिक, दिव्य असं कांहीं होणार आहे.

मुक्ता : काय ? अलौकिक दिव्य ?

लता : होय, अलौकिक दिव्य !—पण तें इतक भयंकर आहे, मुक्ता, कांहीं झालं तरी होतां कामा नये तें.

मुक्ता : आत्तांच्या आत्तां जाऊन भेटतें मी रामनाथांना.

लता : नको जाऊस त्यांच्याकडे. तुला कांहीं तरी करतील ते.

मुक्ता : एक वेळ असा होता कीं त्यांनीं माझ्यासाठीं वाटेल तें आनंदानें केलं असतं.

लता : कुणीं ? त्यांनीं ?

मुक्ता : कुठं रहातात ते ?

लता : कुठं बरं ? —हो, त्या नाक्यावर ती मोठी दगडी बिल्डिंग आहे ना, तिकडे कुठें रहातात ते. —पण तें पत्र—तें पत्र—

रमाकांत : ( आपल्या खोलींतून ) लता !

लता : ( एकदम भ्याल्यासारखी ओरडते ) होय. काय ? काय पाहिजे ?

रमाकांत : भिऊं नकोस, कांहीं नाहीं, कामांत आहेस वाटतं ?

लता : होय. मुक्तानं शिवलेला ब्लाऊज घालून बघतें आहें. आलेंच.

रमाकांत : नको. मीच येतों थोड्या वेळानें बाहेर.

मुक्ता : काढीन मी शोधून त्यांची जागा.

लता : पण काय उपयोग त्याचा आतां ? संपलं सर्व. त्या तिथें पेटींत आहे तें पत्र.

मुक्ता : आणि पेटीची किल्ली रमाकांतांकडे असते वाटतं ?

लता : होय.

मुक्ता : तें पत्र वाचल्याशिवाय परत द्या, म्हणून रामनाथांनीं रमाकांतांना सांगितलं पाहिजे. त्यांनीं कांहीं ना कांहीं तरी सबब काढून तेवढं—

लता : पण याच वेळेला साधारण उघडतात पत्रांची पेटी—

मुक्ता : कांहींना कांहीं युक्ति करून, थांबवून धरलं पाहिजेस तूं त्यांना. जा, तुला बोलावताहेत ना रमाकांत ? —अगदीं शक्य तितक्या लवकर जाऊन येतें मी. ( घाईनें ती निघून जाते. )

लता : ( रमाकांतांच्या खोलीच्या दाराकडे जाऊन दार ढकलते ) हें काय ? मला इतकी हांक मारीत होतां, आणि दाराची अजून कडीसुद्धां काढली नाहीं !

रमाकांत : ( दार उघडून बाहेर येतो व तिला जवळ घेऊन पुढें आणतो. ) या डॉक्टर, आतां काय दिसणार नि काय नाहीं आपणांला ?—अरे ! पण हें काय ?

लता : काय ?

रमाकांत : तो नवा ब्लाऊज घालीत होतीस ना ? आहे कुठें तो ? मला वाटलं होतं, आतां काय दिसणार आणि काय नाहीं !

लता : नाहीं, नाहीं. उद्यां एकदम सर्वांचे डोळे दिपवून टाकणार.

आजच कांहीं नाहीं मिळायचं पाहिला !

रमाकांत : लता, पण तुझा चेहरा अगदीं ओढल्यासारखा दिसतो. काळोख झाला तरी सारखी शिवत बसली होतीस वाटतं ?

लता : छे, मी मुळींच शिवलं नाहीं. मुक्तानं केलं सर्व.

रमाकांत : मग काय, विसरलेलीं गाणीं पुन्हां येतात कां, पहात बसली होतीस कीं काय ?

लता : छे !

रमाकांत : म्हणजे ? लता, उद्यां करणार काय तर मग तूं ? जरा साफसूफ करून ठेव घसा आज.

लता : तुम्हीं शिकविल्याशिवाय कांहीं येणार नाहीं मला. खरंच कांहीं येत नाहीं मला, गडे !

रमाकांत : हात्तिच्या ! आत्तां करूं सर्व बरोबर.

लता : आत्तांच करूं गडे. अगदीं कुठ्ठं जायचं नाहीं माझं गाणं बसल्याशिवाय. छातींत धडधडतं आहे माझ्या.—घ्याल ना बसवून सर्व माझ्याकडून ?—अगदीं कांहीं करायचं नाहीं आतां—नाहीं तर म्हणाल माझे ऑफिसचे कागद—

रमाकांत : नाहीं ग, कांऽऽहीं करत नाहीं, आतां अगदीं सर्वस्वीं राणीसाहेबांच्या सेवेस तयार आहें, झालं ? भित्री चिमणी कुठची ! हो पण, जरा—( दरवाजाकडे जायला निघतो. )

लता : कुठें चाललां ?

रमाकांत : कांहीं पत्र आहे का बघतों.

लता : नाहीं नाहीं. तें सुद्धां करायचं नाहीं, गडे.

रमाकांत : म्हणजे ? कां नको ?

लता : नकोच गडे, कांहीं नाहीं तिथं.

रमाकांत : पहातों तरी—

लता : इकडे या आधीं. कांहीं सांगायचं आहे.

रमाकांत : ( परत येऊन ) काय ?

लता : ( त्याच्या हाताला बिलगून ) छातींत धडधडत आहे माझ्या

उद्यां काय होईल या विचारानं !–तुम्हींच पेटी वाजवा आणि बसवा माझीं गाणीं.

रमाकांत : खरंच ? इतकी घाबरली आहेस तूं ?

लता : होय. अगदीं भयंकर घाबरलें आहें मी. बसा ना गडे. सांगू पेटी आणायला ?

रमाकांत : हो हो. अगदीं तुला पाहिजे तसं कर.

लता : भिमा, ए भिमा !

( भिमा आंतून जी म्हणून ओरडते. )

लता : माझी वाजाची पेटी घेऊन ये बाहेर.

( भिमा पेटी घेऊन उजव्या खोलींतून बाहेर येते. )

रमाकांत : आण ती इकडे. ( कोचावर भिमा पेटी ठेवते, व आंत निघून जाते. )

लता : वाजवा गडे !

रमाकांत : अग पण कुठचं गाणं म्हणणार तूं ?

लता : कुठचं म्हणूं ?–" सत्य वदे......"

रमाकांत : हं. ( पेटी वाजवायला सुरुवात करतो. लता गुणगुणायला लागते. ) म्हण,–काय ग ?

लता : नाहीं जुळत मला.

रमाकांत : म्हणजे ? म्हण, म्हण, भलतंच काय ? ( लता जोरानें कसं तरी म्हणते. ) अग हळूं हळूं; वाघ मागं लागल्यासारखं काय म्हणतेस ?

लता : कसं ? नाहींच येत मला.

रमाकांत : असं काय लता ? चांगलं येतं आहे तुला. मला माहीत आहे. जरा मनापासून प्रयत्न कर.

लता : ( गाऊं लागते. गाण्यांत रंगून देहभान विसरून जाते. रमाकांत मधून मधून सूचना देतो. पण त्या तिला ऐकूं येतात असें दिसत नाहीं. ती गातच रहाते. मुक्ता दरवाजा उघडून आंत येते. )

**मुक्ता** : ( थक्क होऊन पहातच रहाते. ) वाः !

**लता** : छान आहे गाणं, नाहीं मुक्ता !

**रमाकांत** : बसा ना तुम्हीं मुक्ताबाई. ( मुक्ता बसते. ) लता, तूं अगदीं जिवाचा आकांत करून गाते आहेस.

**लता** : आहेच माझा जीव त्यावर अवलंबून.

**रमाकांत** : लता, बरंच विसरली आहेस तूं. खूप प्रॅक्टीस केली पाहिजे तुला.

**लता** : होय. म्हणूनच म्हटलं, तुम्हीं सर्व करून घेतलं पाहिजे माझ्याकडून म्हणून. अगदीं उद्यांचा सबन्ध दिवस सुद्धां सोडणार नाहीं मी तुम्हांला. ऐकणार ना माझं ?

**रमाकांत** : हो, हो, ऐकणार.

**लता** : अगदीं माझ्याजवळ रहायचं आज आणि उद्यां सबन्ध दिवस गडे. दुसऱ्या कश्शा–कश्शाचा विचार करायचा नाहीं–अगदीं, पत्राच्या पेटीला सुद्धां हात लावायचा नाहीं, –एकाहि पत्राला शिवायचं नाहीं !

**रमाकांत** : त्या बदमाष मनुष्याची अजून तुझ्या मनांत भीति आहे वाटतं ?

**लता** : होय गडे !

**रमाकांत** : लता, तुझ्या तोंडावरूनच दिसतं आहे मला, कीं त्याचं एखादं पत्र त्या पेटींत आहे, होय ना ?

**लता** : कुणाला ठाऊक ? असेल कदाचित ! पण तसलं कांहीं आतां तुम्ही मुळींच वाचतां कामा नये. –उद्यांचा सबन्ध दिवस उलटेपर्यंत आपणां दोघांत कांहींच वेडंवाकडं होतां कामा नये.

**डॉक्टर** : ऐक रे तिचं तेवढं.

**मुक्ता** : ( हळूंच ) ऐका तिचं तेवढं.

**रमाकांत** : ( तिचा हात धरून ) बरं, जसं आमची चिमणी म्हणते, तसं करायचं ! झालं ? पण उद्यां रात्रीं पार्टीहून आल्यानन्तर—

**लता** : नन्तर–नन्तर तुम्ही मोकळे आहां वाटेल तें करायला.

( भिमा उजव्या बाजूच्या खोलींतून बाहेर येते. )

**भिमा** : सैपाकीणबाई म्हणतात, जेवण अगदीं तयार आहे बाई-साहेब !

**रमाकांत** : सर्वांना बरोबरच वाढायला सांग. भिमा, ( भिमा जाते. ) मुक्ताबाई आज आपल्याकडेच जेवणार आहेत ना ?

**लता** : होय. आमच्याकडे येशील संध्याकाळीं ती जेवायलाच ये असा निरोप धाडला होता मी सकाळीं. –भिमा !

( भिमा बाहेर येते )

**भिमा** : जी !

**लता** : बाईंना म्हणावं, मुरंब्याची बरणी काढून सर्वांना मुरम्बा वाढा–खूप वाढा.

**भिमा** : जी. ( भिमा जाते )

**रमाकांत** : ओ हो, आज आम्हाला मेजवानी दिसते आहे.

**लता** : होय. दिवाळीचा सारा उत्सव आजच करायचा. दिवाळीचा फराळहि थोडा वाढायला सांगतें जेवणावरच.

**रमाकांत** : लता, असं काय ? –अगदीं गडबडून गेल्यासारखी दिसते आहेस तूं. नेहमीं सारखी आनन्दांत चिवचिवणारी चिमणी नाहीं दिसत तूं आज !

**लता** : दिसेन, दिसेन, –पण जा, तुम्ही पाय धुऊन पानावर बसा. आम्हीं दोघीं येतोंच.

**रमाकांत** : अच्छा ! ( उजव्या बाजूच्या खोलींत जातो )

**लता** : ( मुक्ताकडे वळून ) काय ?

**मुक्ता** : पुण्याला जायला निघून गेले ते.

**लता** : तुझ्या तोंडावरूनच दिसलं मला.

**मुक्ता** : पण उद्यां संध्याकाळींच परत येणार आहेत ते. अगदीं तांतडीची चिठ्ठी लिहून ठेवली आहे मी त्यांच्या इथं.

**लता** : कशाला ठेवलीस ? काय व्हायचं ते होऊं द्यावं–कांहीं तरी

अलौकिक दिव्य होणार म्हणून नुसती वाट पहात रहाण्यांतसुद्धां एक प्रकारें कांहीं अद्वितीय वाटत असतं.

**मुक्ता :** कसली वाट पहाते आहेस तूं लता !

**लता :** नाहीं समजायचं तुला, मुक्ता. खालीं मुलं आहेत, त्यांना जरा वर घेऊन ये. मुक्ता जा. ( मुक्ता जाते. लता कांहीं वेळ स्तब्ध उभी रहाते.—जणूं काय ती स्वतःच मन शांत करीत आहे. नन्तर घड्याळाकडे पहात ) आठ वाजले. उद्यां आठ वाजेपर्यंत चोवीस तास आणि नन्तर एक, दोन तास, मग पार्टी संपली. चोवीस आणि दोन किती ? —सव्वीस—सव्वीस तास या जगांत रहायचं.

**रमाकांत :** ( खोलीच्या दारांत येऊन ) लता, येतेस ना तूं !

**लता :** ( हात पसरून जवळ जवळ त्याच्या अंगावर जाऊन पडते. ) ही आलेंच !

( पडदा पडतो. )

———



[ तोच दिवाणखाना. रात्रीं नऊ साडेनऊची वेळ. कोचावर मुक्ता बसली आहे. ]

**मुक्ता** : ( दिवाणखान्यांतल्या घड्याळाकडे पहात ) अजून का बरं येत नाहींत ? वेळ तर होत आली. ( दाराकडे कान देऊन ) आलेच वाटतं. ( पुढें जाऊन दरवाजा उघडते. जिन्यावर पावलांचा आवाज होतो. हलक्या आवाजांत ) या, कुणी नाहीं आंत.

**रामनाथ** : ( दारांतच उभा राहून ) आपण माझ्या घरीं ठेवलेली चिठ्ठी मला मिळाली. काय बरं याचा अर्थ ?

**मुक्ता** : मला तुमच्याशीं कांहीं गोष्ट बोलणं फार आवश्यक आहे.

**रामनाथ** : खरंच ! आणि ती गोष्ट अगदीं इथेंच बोलणं अत्यंत आवश्यक आहे का ?

**मुक्ता** : होय. मी रहातें तिथं खासगी गोष्टी बोलणं अशक्य आहे. माझी स्वतःची अशी तिथं निराळी खोली नाहीं. या ना ! खरंच

आंत या. कुणी नाहीं इथं. गडी नोकर बाहेर झोपले आहेत, आणि रमाकांत लता पार्टीला गेलीं आहेत.

रामनाथ : ( दिवाणखान्यांत येऊन ) खरंच, रमाकांत लता पार्टीला गेलीं आहेत!

मुक्ता : म्हणजे ? त्यांनीं कां जाऊं नये ?

रामनाथ : खरंच, कां जाऊं नये ?

मुक्ता : रामनाथ, मला तुमच्याशीं किती किती बोलायचं आहे.

रामनाथ : आपणां दोघांना बोलण्यासारखं कांहीं आहे का ?

मुक्ता : कां ? आपणांला खूप बोलण्यासारखं आहे.

रामनाथ : मला नाहीं वाटत.

मुक्ता : रामनाथ, माझं अंतःकरण तुम्हांला कधींच बरोबर कळलं नाहीं.

रामनाथ : सर्व जगाला जें कळून चुकलं, त्यांत मला कळण्यासारखं असं आणखी काय होतं ? खूप पैसेवाला नवरा मिळण्याची संधि आल्याबरोबर प्रेमाच्या आणाभाका दिलेल्या आपल्या गरीब प्रियकराला एक अंतःकरणशून्य स्त्री कशी बेमुर्वतपणें सोडून देते, हेंच ना तें!

मुक्ता : मी इतकी अंतःकरणशून्य असेन, असं विश्वासपूर्वक वाटतं का तुम्हांला, रामनाथ ? आणि तसं करतांना मला अगदीं कांहींच दुःख झालं नाहीं का ?

रामनाथ : झालं ?

मुक्ता : नाहीं झालं असं खरंच वाटतं तुम्हांला ?

रामनाथ : तर मग त्या वेळीं लिहिलेलं तें भयंकर पत्र कसं बरं लिहिलंस तूं!

मुक्ता : रामनाथ, माझा नाइलाज होता. मला तुम्हांला सोडायचं होतं, त्या अर्थी माझ्या विषयीं वाटत असलेलं सर्व प्रेम, सर्व भावना जळून खाक होणं अत्यंत आवश्यक होतं.

रामनाथ : हं. अस्सं. आणि तें सर्व श्रीमंतीसाठीं, होय ना!

**मुक्ता :** रामनाथ, मला त्या वेळीं माझी म्हातारी अपंग आई आणि दोन पोरकीं भावंडं होतीं, हें तुम्हीं विसरतां. माझ्यावर त्यांचं पालनपोषण अवलंबून होतं. आणि तुम्हीं तर आमच्याही-पेक्षां गरीब होतां.

**रामनाथ :** असेल. पण म्हणून मला दिलेलीं वचनं मोडून तूं दुसऱ्याशीं लग्न करणं रास्त नव्हतं.

**मुक्ता :** रामनाथ, रास्त होतं कीं नव्हतं ! खरंच मलाहि पुष्कळ वेळां तसंच वाटतं.

**रामनाथ :** ( जरा प्रेमळपणानें ) मुक्ता, मला तूं सोडून गेल्यावर, माझ्या पायाखालची धरणी दुभंगल्यासारखं मला झालं. आणि हल्लीं माझी काय अवस्था आहे ?—तुफान वादळांत एखाद्या ओंड-क्याला बिलगून कसाबसा तरंगत राहणाऱ्या माणसासारखी माझी स्थिति आहे.

**मुक्ता :** पण वादळांतही एखादा साहाय्यकर्ता सोबती मिळत नाहीं का ?

**रामनाथ :** होय. अगदीं साहाय्य मिळायची वेळ आली होती; पण पुन्हां तूं मध्यें आड आलीस.

**मुक्ता :** पण त्याची मला कल्पनाहि नव्हती, रामनाथ. तुमच्या जागेवर रमाकांत माझी नेमणूक करणार आहेत, हें आज कळलं मला.

**रामनाथ :** असेल. पण आतां कळल्यावर तरी माझ्यासाठीं तूं नको म्हणणार नाहींस का ती ?

**मुक्ता :** नाहीं. कारण त्यापासून तुमचा कांहीच फायदा होणार नाहीं.

**रामनाथ :** फायदा असो कीं नसो. माझा नाइलाज आहे.

**मुक्ता :** रामनाथ, जगाच्या कडु, कठीण अनुभवाच्या चरकांतून पिळून निघाल्यामुळें मला बराच शहाणपणा आला आहे. आणि कसं वागावं हेंहि मला कळूं लागलं आहे.

**रामनाथ** : आणि तसल्याच अनुभवानं मला सुंदर, नाटकी भाषणांवर विश्वास ठेवूं नये, असं शिकवलं आहे !

**मुक्ता** : तर मग खूपच शिकलां आहां तुम्ही. पण भाषणावर नसला तरी कृतीवर तरी तुम्ही विश्वास ठेवाल ना ?

**रामनाथ** : म्हणजे ?

**मुक्ता** : म्हणजे, तुफान वादळांत एखाद्या ओंडक्याला बिलगून तरंगत राहणाऱ्या माणसासारखी तुमची स्थिति आहे, असं तुम्हीं म्हणालांत ना ?

**रामनाथ** : होय मग ? आहेच तसं.

**मुक्ता** : मग मीही आयुष्याच्या तुफान वादळांत; कशीतरी धडपडते आहें.—कुणासाठीं हंसेन तर हंसायलाहि कुणी नाहीं, आणि रडेन तर रडा-यलाहि मला कुणी नाहीं.

**रामनाथ** : त्याला जबाबदार तूंच नाहींस का ?

**मुक्ता** : होय, पण तेव्हां माझा इलाजच नव्हता.

**रामनाथ** : मग, आतां काय ?

**मुक्ता** : कां ? वादळांत सांपडलेलीं दोन माणसं एकमेकांजवळ येऊन राहिली तर दोघांनाही किती धीर येईल बरं ?

**रामनाथ** : मुक्ता !

**मुक्ता** : रामनाथ, मग उमरावती सोडून, मी मुंबईस कां निघून आलें असं तुम्हांला वाटतं ?

**रामनाथ** : म्हणजे ? तूं माझ्यासाठीं आलीस ?

**मुक्ता** : रामनाथ, आतांपर्यंत सारं आयुष्य मी कांहींना कांहीं करण्यांत घालवलं. काम नसलं तर मला अगदीं उघडं उघडं वाटूं लागे. जगणं नकोसं होई. कामांत गुंतून रहाणं, हेंच माझं सुख—सर्वस्व होतं. आई मेली, भावंडं कर्तीसवर्ती झालीं. आतां मी जगांत एकटी—अगदीं एकटी झालें आहें. आतां कुणासाठीं मी धडपड करूं ? स्वतःसाठीं राबण्यांत कांहींच सुख नाहीं. रामनाथ कुणीतरी—कुणीतरी ज्याच्यासाठीं मी रात्रंदिवस झटावं असं

मला पाहिजे आहे. रामनाथ, मला मिळेल का तें ?

**रामनाथ** : छे, नाहीं विश्वास बसत माझा. केवळ दयेनें भलत्याच औदार्याला बळी पडून, तूं मला स्वात्मसमर्पण करूं पहाते आहेस.

**मुक्ता** : रामनाथ, मी तशी आहें असं तुम्हांला वाटतं कां ?

**रामनाथ** : खरंच, तूं मनापासून बोलते आहेस हें ? सांग मुक्ता, माझ्या पूर्व आयुष्यासंबंधीं तुला सर्व माहीत आहे का ?

**मुक्ता** : अगदीं सर्व, रामनाथ.

**रामनाथ** : आणि माझ्याविषयीं इथं लोकांचं काय मत आहे हें माहीत आहे तुला ?

**मुक्ता** : म्हणजे ! मी तुमच्याशीं लग्न केलं असतं, तर तुमच्या हातून तशा चुका झाल्या नसत्या असंच तुमचं म्हणणं होय ना ?

**रामनाथ** : होय, अगदीं असंच. निराशेच्या भरांत त्या वेळेला मी वाटेल तें केलं.

**मुक्ता** : मग, अजून ती वेळ अगदीं गेली कां ?

**रामनाथ** : मुक्ता, तूं विचार करून बोलते आहेस कां ? ( थांबून ) होय. तुझा चेहरा तेंच सांगत आहे. खरंच, खरंच मुक्ता, तुला आहे इतकं धैर्य ? मग—

**मुक्ता** : होय, माझ्या मातृहृदयाची पांखर कुणावर तरी घातल्या-शिवाय मला राहवणार नाहीं; आणि रामनाथ, तुमची मातृहीन छबकडी मला आई म्हणून बिलगणार नाहींत का ? आपणां दोघां-नाही, रामनाथ, एकमेकांची जरूर आहे. रामनाथ, रामनाथ माझा तुमच्यावर पूर्ण भरंवसा आहे. तुमच्याबरोबर मी वाटेल तें करूं शकेन.

**रामनाथ** : ( एकदम तिचा हात आपल्या हातांत दाबून धरून ) मुक्ता, मुक्ता, तुझ्या सहवासांत आतां जगांत मी माझं नांव केव्हांच उजळून दाखवीन. पण—

**मुक्ता** : हं, हं, रामनाथ चला आतां. अगबाई ! दहा वाजायला आले. रमाकांत लता यायची वेळ झाली.

**रामनाथ** : जातों मी मुक्ता. पण या कुटुंबाला मी कोणत्या संकटांत घातलं आहे याची तुला कांहींच माहिती नाहीं वाटतं ?

**मुक्ता** : आहे माहीत मला.

**रामनाथ** : आणि तरी पण तू माझ्याशीं—

**मुक्ता** : रामनाथ, तुमच्यासारखा मनुष्य प्रसंगाच्या कात्रींत सांपडला, म्हणजे बेफाम होऊन निराशेच्या भरांत काय करील नी काय नाहीं याचा नेम आहे का ? मला एवढं कळत नाहीं का ?

**रामनाथ** : अरेरे, ही झालेली गोष्ट मला परत घेतां आली तर—

**मुक्ता** : तें शक्य नाहीं, रामनाथ, तुमचं पत्र कुलूप लावलेल्या पत्राच्या पेटींत पडलेलं आहे.

**रामनाथ** : आहेच कां तें तिथं ?

**मुक्ता** : संशयच नाहीं मुळीं; पण—

**रामनाथ** : ( तिच्याकडे रोखून पाहून ) मुक्ता, कांहींही करून आपल्या मैत्रिणीला वांचवण्याचा तुझा हा प्रयत्न नाहीं ना ? तुझ्या या सर्व प्रेमळपणाचा हाच का अर्थ ? सांग. स्पष्ट सांग मला. होय ना ?

**मुक्ता** : रामनाथ, दुसऱ्यासाठीं स्वतःचं सर्वस्व स्त्री एकदाच देते. पुन्हां पुन्हां करण्यासारखी ती गोष्ट नाहीं. जगाचा इतका अनुभव घेतल्यावर मी असं करीन असं तुम्हांला वाटत कां ?

**रामनाथ** : बरं तर मी माझं पत्र जसच्या तसं परत मागेन.

**मुक्ता** : छे, तस मुळींच करतां कामा नये.

**रामनाथ** : नाहीं, नाहीं. तें केलंच पाहिजे. रमाकांत येईपर्यंत मी थांबतो; तो आला कीं माझं पत्र मी परत मागतां. त्याला सांगेन कीं तें फक्त माझ्या नोकरीसंबंधीं आहे, तू वाचतां कामा नयेस तें.

**मुक्ता** : अं ह. रामनाथ, तुम्हीं तें पत्र परत मागतां कामा नये.

**रामनाथ** : असं काय मुक्ता ! तू याचकरतां मला इथ बोलावलं नाहींस का ?

**मुक्ता** : होय. पहिल्याच क्षणीं मी भिऊन जाऊन तस केल खरं.

पण त्यानंतर पुरे चोव्वीस तास झाले आणि तेवढ्या वेळांत कुणी विश्वासही ठेवणार नाहीं, अशा गोष्टी या कुटुंबांत माझ्या नजरेस आल्या. दमल्या भागल्यानंतर मन रिझविण्याकरितां खेळ-ण्याची एखादी बाहुली, यापेक्षां लतेची या घरांत कांहींच किंमत नाहीं. हें घाणेरड गुपित त्याला समजलंच पाहिजे. या नवराबायकोची परस्परांना खरी ओळख पटलीच पाहिजे, आणि ही असली छपवाछपवी जर अशीच चालू राहिली तर ती पटणें मुष्कील होईल.

**रामनाथ :** तू जर ही जबाबदारी घ्यायला तयार आहेस तर बरं आहे. पण एक गोष्ट तरी मला करतां येणं शक्य आहे, आणि ती मी लगेच करणार. तो बाँड—

**मुक्ता :** रामनाथ, आतां पुरें, चला, वाजले किती पहा. आत्तां तीं येतील. आपणांला त्यांनीं इथ पाहिल तर—

**रामनाथ :** बरं तर जातों मी. तुझी वाट पहात मी खालीं रस्त्या-वर एका बाजूला उभा रहातों.

**मुक्ता :** बरं. मलासुद्धां यांना भेटून परत घरीं जातांना कुणीतरी सोबत पाहिजेच आहे.

**रामनाथ :** उभ्या जन्मांत देवाची माझ्यावर इतकी मेहेरनजर कधींच झाली नव्हती. ( जातो )

( मुक्ता दिवाणखान्यांतल्या सर्व वस्तु नीट लावून ठेवते व स्वतःची बॅग, छत्री वगैरे जाण्याच्या तयारींत ठेवते.)

**मुक्ता :** अहाहा, कित्ती कित्ती चांगलं झालं ! ज्याच्यासाठीं जगावं आणि अंग मोडून काम करावं, असा जिवाचा आधार मला मिळाला ! आतां मी त्यांना सुखी नाहीं का करणार ? ( घड्या-ळाकडे बघून ) काय बाई, अजून ही मण्डळी येत नाहींत कशी बरं ? ( जिन्यावर पावलांचे आवाज ऐकते ) आलींच वाटतं. ( जाण्याच्या तयारीनं उभी राहते. रमाकांत आणि लतेचा आवाज बाहेर जिन्यावर ऐकूं येतो. रमाकांत जवळ जवळ दंड

धरून लतेला आंत आणतो. त्यानें सुन्दर सूट घातला आहे. लते-चेही कपडे अत्यंत चित्ताकर्षक आहेत. )

**लता** : बाई, बाई, बाई, काय घाई तुमची —सर्व बायका मला आणखी "गा गा" म्हणत असतांना तुमचे " घरीं चल " म्हणून अगदीं निरोपावर निरोप येत होते. आज किती दिवसांनीं मला अगदीं मोकळेपणानं सर्व बायकांत गात बसावसं वाटत होतं !

**रमाकांत** : पण लता——

**लता** : एक तास आणखीन थांबलें असतें तर काय होणार होतं अगदीं ? माझं तेवढं सुद्धां ऐकलं नाहीं ना ?

**रमाकांत** : किती दमली आहेस तूं. तिथें आणखी एक क्षणभर-सुद्धां थांबणं बरं नव्हतं. चल. आपणांला जेवायचं नाही ना ? कपडे बदलून पड जा बघूं.

( मुक्ता दृष्टीस पडते. )

**लता** : कोण मुक्ता ? तूं केव्हां आलीस ?

**मुक्ता** : आठ वाजल्यापासून बसलें आहें मी. काल तूं अगदीं आपण असा थाट करणार नि तसे कपडे घालणार असं सांगितलं होतंस म्हणून म्हटलं इथं शेजारींच आलें होतें, ती तुला तुझ्या थाटांत बघून तरी जावं ! पण साडेनऊ वाजले तरी तुमची दाद नाहीं. मलाहि जेवायचं नव्हतं, तेव्हां बसलें वाचीत इथंच झालं.

**रमाकांत** : खरंच, मुक्ताबाई. किती सुन्दर दिसते नाहीं लता या कपड्यांत ?

**मुक्ता** : खरंच, खरंच. लता किती छान दिसतेस तूं !

**लता** : पण यांना कोण घाईग तिथं. सर्व बायका अगदीं तटस्थपणें माझं गाणं ऐकत होत्या, नि यांचीं बोलावण्यावर बोलावणीं !

**रमाकांत** : ऐका तर खरं, मुक्ताबाई. आतांच पहा, किती घामा-घूम झाली आहे दमून; आणि म्हणे आणखी गाणार होती ! थोडक्यांत मजा. हो कीं नाहीं मुक्ताबाई ? सर्वांना चटक लाव-ल्यावर लगेच गाणं थांबवण्यांतच मजा. अं ? बऽऽरं काय उकडतं

आहे. मी कपडे बदलतों आधीं. ( उजव्या बाजूच्या आपल्या खोलींत जातो. )

लता : ( अगदीं घाईनें, श्वासही न घेतां ) काय—काय झालं मुक्ता मग ?

मुक्ता : त्यांचं माझं बोलणं झालं.

लता : आणि मग ?

मुक्ता : हें सर्व गुपित तूं आपल्या पतीला सांगीतलंच पाहिजेस, लता.

लता : ( वर चेहरा करून, अगदीं निर्विकार आवाजांत ) होय, शेवटीं तेंच.

मुक्ता : रामनाथांची तुला अगदीं कांहीं भीति बाळगायला नको; पण तूं आपल्या पतीला सर्व मनमोकळेपणानं सांगणं हेंच बरं.

लता : मी नाहीं सांगणार त्यांना.

मुक्ता : तर मग तें पत्र वाचून तरी रमाकांतांना कळणारच.

लता : ( गंभीर आवाजांत ) मुक्ता गडे, तूं म्हणतेस तेंच खरं. आतां माझ्या ध्यानांत आलं काय करायचं तें.

मुक्ता : जातें मी, लता, संभाळ.

( मुक्ता जाते, इतक्यांत उजव्या बाजूच्या खोलीचा दरवाजा उघडून रमाकांत येतो. )

रमाकांत : गेली एकदाची ! काय चिकट ब्याद आहे ही तुझी मैत्रिण. किती थकली आहेस तूं लता !

लता : तुम्ही थकलेले दिसतां अगदीं !

रमाकांत : छे, मुळींच नाहीं. असल्या समारंभाहून आल्यानंतर मला उलट अगदीं हुशारी नि तरतरी वाटते बुवा !

लता : होय. मला जाऊन पडलंच पाहिजे.

रमाकांत : पाहिलंस. आणि मला म्हणत होतीस तुम्ही उगीच घाई करतां म्हणून.

लता : खरंच. तुम्ही करतां तें सगळं बरोबरच असतं !

**रमाकांत :** ( तिला जवळ घेऊन ) आतां माझी मैना कशी बरोबर बोलली ! ( दोन्ही हातांनीं तिला समोर धरून तिच्याकडे कांहीं वेळ डोळे भरून पहातो. ) लता, लाडके, किती मनोहर दिसतेस तूं ! तुला अशी जवळ घेऊन बसलं, म्हणजे, दिक्काल विसरून असंच रहावंसं वाटतं !

**लता :** असं काय बरं पहात रहातां माझ्याकडे ?

**रमाकांत :** का, पाहूं नये मी ? हा भलताच उदासपणा कसला गडे ? लता, लाडके, माझं तुझ्यावर किती प्रेम आहे याची तुला कल्पना तरी आहे का ? आजच्या सारख्या समारंभाच्या ठिकाणीं तुला मी घेऊन गेलों, म्हणजे माझी कशी मनःस्थिति होते; सांगूं तुला लता ? प्रेमाच्या पहिल्याच बहरांत तरुणतरुणीची जी स्थिति होते तसं मला होतं. आपल्या सौंदर्याच्या दिमाखांत तूं सर्व लोकांतून फिरत आहेस. तुझ्या सौंदर्यानं सर्व लोक वेडावून गेले आहेत. तुझ्या नि माझ्या गुप्त प्रीतीची लोकांना खबरहि नाहीं. आणि चोरून आपल्या वल्लभेकडे पाहणाऱ्या तरुण प्रियकरांप्रमाणें, सर्व जनांना दिपवून टाकणारी ही सौंदर्यलतिका माझी आहे, अशा साभिमान गुप्त आनंदांत तूं जिकडे जिकडे जातेस, तिकडे तिकडे माझे डोळे तुझ्यामागून फिरत आहेत; अगदीं असं मला होतं लता !

**लता :** आपलं माझ्यावर आहेच तसं प्रेम, गडे !

**रमाकांत :** आणि आज जेव्हां तुझ्या गाण्याचे गोड स्वर बाहेर येऊं लागले, तेव्हां अगदीं रहावेना माझ्यानें ! सर्व लोकांतून तुला घरीं आणून, सर्वस्वीं माझ्या असलेल्या या माझ्या लाडक्या बुल्बुलाला, मी अगदीं एकटा घेऊन माझ्या जवळ बसणार म्हणून, मी तुला तिथून घेऊन आलों, लता.

( तिला जवळ घेतो. ती त्याच्या बाहुपाशांतून स्वतःला सोडविण्याचा प्रयत्न करते. )

**लता :** नको गडे. मला अगदीं कांहीं सुचत नाहीं आज.

**रमाकांत** : लता ! असं काय ? मी तुझा नाहीं का ?

**लता** : ( दचकून ) ऐकलंत ?

**रमाकांत** : ( दरवाजाकडे जात ) कोण आहे ?

**डॉक्टर** : ( बाहेरून ) मी आहें, जरा आंत येऊं का ? थोडं काम आहे.

**रमाकांत** : ( त्रासून अगदीं हळूं आवाजांत ) काय पाहिजे या वेळीं याला ? ( मोठ्यानें ) थांबा उघडतों हं दरवाजा. ( दरवाजा उघडतो ) या ना डॉक्टर.

**डॉक्टर** : जात होतो इथून, म्हटलं बघावं आंत डोकावून. ( एक क्षणभर सर्व खोलींत नजर फिरवून ) हें नेहमीचं ओळखीचं घर— रोजच्या संवयीनें त्याच्यावरहि माझं प्रेम जडलं होतं. तुम्ही दोघेहि इथं अगदीं मोठ्या प्रेमांत आणि सुखांत रहात असाल नाहीं ?

**रमाकांत** : पार्टीत बीरवर वगैरे यथेच्छ ताव मारलेला दिसतो आहे तुम्हीं डॉक्टर !

**डॉक्टर** : होयच. कां मारूं नये मी ? जगांत शक्य तितकी मजा मारून कां घेऊं नये ? —निदान जितके दिवस शक्य असेल तो-पर्यंत तरी ? खरंच, आजच्या बीरची टेस्ट कांहीं और होती ! आणि सगळा दिवस काम केल्यावर तर थोडी मजा मारायला कांहींच हरकत नाहीं.

**रमाकांत** : काय ? सगळा दिवस कसलं काम करीत होतां, डॉक्टर ?

**लता** : आज आपल्या लॅबोरेटरींत कांहीं शास्त्रीय शोधाचं काम करीत होतां वाटतं तुम्ही ?

**डॉक्टर** : अगदीं बरोबर ओळखलंस. तेंच !

**रमाकांत** : अरे, वा लता, तूं पण शास्त्रीय शोधाच्या गोष्टी बोलं लागलीस !

**लता** : मग,—डॉक्टर शोध अगदीं यशस्वी झाला का ?

**डॉक्टर** : अगदीं सोळा आणे यशस्वी ! —डॉक्टर आणि पेशंट

दोघांच्याहि दृष्टीनं शेवटचा निकाल लागला.

**लता** : ( चटकन्–उत्कंठित स्वरांत ) अगदीं खात्री, डॉक्टर !

**डॉक्टर** : अगदीं पुरेपुर खात्री ! –मऽऽग, इतकं झाल्यावर आज मनसोक्त शक्य तितकी मजा मारून घेणं माझं कर्तव्य नव्हतं का ?

**लता** : हो तर, दुसरं काय ?

**रमाकांत** : माझंहि मत तसंच आहे. कां मजा मारूं नये तुम्ही ? मात्र आज हवी तशी मजा मारली त्याचा आपल्याच बिचाऱ्या शरीराला उद्यां हिशोब द्यावा लागेल, हें ध्यानांत ठेवलं पाहिजे.

**डॉक्टर** : अं. त्यांत काय मोठं ! जगांत असं काय करतां येतं, कीं ज्याचा केव्हांना केव्हां तरी हिशोब द्यावा लागत नाहीं ?

**लता** : डॉक्टर, आजच्या सारख्या पार्ट्यांना चांगले चांगले कपडे घालून नेहमीं जावसं वाटतं कीं नाहीं तुम्हांला ?

**डॉक्टर** : अलबत ! वाटतं तर !

**लता** : मग, सांगा बघूं पुढच्या असल्याच एखाद्या पार्टीला मी कसल्या रंगाचा शालू नेसूं ?

**रमाकांत** : ए वेडे, आजची पार्टी संपली नाहीं तो दुसऱ्या पार्टीचा कसला विचार करते आहेस ?

**लता** : सांगा डॉक्टर, –आणि हो, –तुम्ही कसलाहो सूट घालणार ?

**डॉक्टर** : पुढच्या पार्टीला मी होय ? –मला सूट नको –मी अदृश्यरूपानें येणार ! हो, नाहीं तर अगदीं मध्यरात्रीच्या रंगाचा काळा, झगा घालून येईन !

**रमाकांत** : ( हंसू दाबून ) वा, डॉक्टर, अगदीं छान शोभेल तुम्हांला तो !

**डॉक्टर** : अरे, –पण मी इथें ज्याकरितां या वेळीं आलों तें विसरलोच मागायला ! –बेटा रमाकांत, तूं आणि मी नेहमीं ओढतों त्या तुझ्या ' हॅवाना ' सिगारमधला एक सिगार काढ बघूं !

**रमाकांत** : ओ, पाहिजे तितके घ्या. ( सिगारपेटी पुढें करतो.

डॉक्टर एक सिगार घेतात व तिचें टोंक तोडतात. लता काड्याची पेटी त्यांना आणून देते. )

**डॉक्टर** : बरं येतो. आमचा रामराम घ्यावा आतां !

**रमाकांत** : अच्छा, डॉक्टर.

**लता** : डॉक्टर, प्रकृतीला सांभाळा बरं !

**डॉक्टर** : बरं, बरं. तूं सांभाळ स्वतःला म्हणजे झालं. ( जातात )

**रमाकांत** : ( हलक्या आवाजांत ) आज खूपच झोंकली आहे डॉक्टरांनीं.

**लता** : ( विमनस्कपणें ) असेल.

( रमाकांत किल्लया घेतो, आणि दरवाजाकडे जाऊं लागतो. )

**लता** : कुठें जातां किल्लया घेऊन ?

**रमाकांत** : पत्रं बरींच जमलीं असणार पेटींत, तीं घेतों काढून, नाहीं तर सकाळचा पेपरसुद्धां पोऱ्याला आंत टाकतां येणार नाहीं.

( तो दरवाजाकडे जाऊन पेटीला चावी लावायचा प्रयत्न करतो. )

**लता** : म्हणजे, ऑफिसचीं पत्रं घेऊन आतां रात्रीं पुन्हां ऑफिसचं काम करीत बसणार कीं काय तुम्ही ?

**रमाकांत** : माहीत असून विचारतेस काय ? या वेळेला मी काम करणार होय ? —अरे, पण हें काय ? पेटी उघडायचा कुणी तरी प्रयत्न केलेला दिसतो !

**लता** : पेटी उघडायचा ?

**रमाकांत** : हं. खात्रीनं —हा मोडका आकडा कुणाचा चावीच्या भोंकांत ? —लता, हा तर तुझ्या केंसांतला दिसतो.

**लता** : ( चटकन ) मुलांचं असेल काम तें.

**रमाकांत** : किती वेळ सांगितलं आहे मी तुला, कीं त्यांना असले खेळ करायला देऊ नकोस म्हणून ?—उघडलं बुवा एकदांचं ! ( पेटींतलीं सर्व पत्रें काढून घेतो. आणि " भिमा, भिमा " म्हणून हांका मारतो. ) भिमा, जिन्यावरचा दिवा काढून टाक ! ( आंत येतो. दरवाजा लावून घेतो, आणि हातांतली पत्रांची रास

पुढें करून ) पहा केवढी ही रास आहे ! ( ती चाळतो ) हें रे काय बुवा ?

**लता** : तें पत्र नको, गडे, नको–

**रमाकांत** : दोन व्हिजिटिंग कार्डे–डॉ. संतांच्या नांवाचीं दिसतात.

**लता** : डॉक्टर संतांचीं ?

**रमाकांत** : ( पहात ) हो, संतांचींच. अगदीं वरतींच होतीं तीं. मघाशीं बाहेर जातांना त्यांनीं टाकलीं असावीं तीं.

**लता** : त्यांच्यावर कांहीं लिहिलेलं आहे का ?

**रमाकांत** : स्वतःच्या नांवाच्या अक्षरांवर काळीभोर, ढळढळीत फुली मारली आहे–काय अवचिन्ह दिसतं हें ! स्वतःच्या मृत्यूची स्वतःच खबर देण्यासारखं आहे.

**लता** : त्याचा अर्थ तोच आहे.

**रमाकांत** : म्हणजे तुला कांहींतरी माहिती दिसते याची. डॉक्टर काहीं म्हणाले होते कीं काय ?

**लता** : होय. ते म्हणाले होते, कीं अशा तऱ्हेचीं माझीं कार्डें मिळालीं, कीं माझा तो शेवटचा निरोप समजा. त्यानंतर मी स्वतःला कोंडून घेणार, आणि शांतपणें मरणार.

**रमाकांत** : अरेरे ! बिचारे डॉक्टर ! आतां फार दिवस आपल्याला त्यांच्या सहवासाचा लाभ होणार नाहीं, हें मला माहीत होतं, पण इतक्या लवकर तें होईल असं वाटलं नव्हतं.–हुंः ! आणि म्हणून बिचारं जखमी झालेलं जनावर जसं धडपडत पळतं, कुठें तरी खबदडींत जाऊन स्वतःचं अंग टाकतं, आणि शांतपणें प्राण सोडतं, तसं स्वतःला स्वतःच्या खोलींत जाऊन कोंडून घेता-हेत होय !

**लता** : होय. व्हायचंच असेल तें उगाच वायफळ शब्दांशिवाय शांतपणेंच झालेलं बरं नाहीं काय ? तुम्हांला नाहीं असं वाटत ?

**रमाकांत** : ( इकडे तिकडे फेऱ्या घालीत ) अलिकडे अलिकडे अगदीं आपल्यापैकींच ते एक झाले होते. आपल्यांतून ते गेले ही

कल्पनाच मला करतां येत नाहीं. ढगाळ आकाशावर सूर्यप्रकाश जसा खुलून दिसतो, तसा त्या बिचाऱ्यांच्या दुखणाईत, एकलकोंड्या आयुष्याच्या पार्श्वभूमीवर आपला आनंदी संसार खुलून दिसत होता. अच्छा ! झालं तें झालं—निदान त्यांचं तरी बरच झालं एका अर्थी ( स्तब्ध उभा राहतो ). आपल्याही दृष्टीनें कदाचित् बरंच झालं असं मला वाटतं, लता. आतां आपणां दोघांना अगदीं कुणीच मायेचें उरल नाहीं. तुला मी आणि मला तूं ! ( तिच्या कमरेभोंवतीं हाताचा विळखा घालतो. ) लाडके, तुला उराशी किती किती घट्ट आंवळून धरावीशी वाटते ! कित्ती वेळां मला वाटतं, लता, तुझ्यावर एखादं भयंकर संकट याव आणि मग, मी तुझ्यासाठीं सर्वस्वाचा त्याग करावा,—स्वतःच्या पंचप्राणांची कुरवंडी ओवाळावी.

**लता** : ( त्याच्या बाहुपाशांतून स्वतःला सोडविते आणि कांहीं तरी निश्चय केल्यासारखा चेहरा करून स्पष्ट शब्दांत बोलते. ) तीं पत्रं आत्तांच वाचावीं, गडे.

**रमाकांत** : छे, छे. रात्रीं—आत्तां नाहीं. माझ्या जिवाच्या फुला, आज अगदीं तुझ्याजवळ सारखा सारखा तुझ्याजवळ रहाणार मी !

**लता** : तुमच्या जीवश्चकंठश्च स्नेह्याच्या मृत्यूची छाया मनांत सारखी तरळत असतांना—

**रमाकांत** : खरंच. आपणां दोघांवरही परिणाम झाला आहे त्याचा. आपणां दोघांचींही मनं एक होण्याच्या मध्यें कांहीं तरी वाईट गोष्ट येते आहे खरी—मृत्यूची भयंकर छाया—तीच मृत्यूच्या यातनांची छाया ! स्वस्थ झोंप घेतल्याशिवाय बरं नाहीं वाटायचं आपणांला ! तू जाऊन पड जा बघूं एकदम. मी हीं पत्र नेऊन पहातों माझ्या खोलींत कांहीं महत्त्वाचीं आहेत का; आणि येतोंच थोड्या वेळानें. जा, झोंप जा.

**लता** : ( त्याच्या खांद्यावर मान टाकते. ) बरं गडे.

**रमाकांत** : ( तिच्या कपाळाचा मुका घेऊन ) माझी चिमणी

ती ! अगदीं स्वस्थ झोंप बरं ! ( पत्रें उचलून घेतो व आपल्या खोलींत जातो.)

लता : ( लता लुगडयाचा पदर कमरेला घट्ट बांधूं लागते, आणि त्याच्या खोलीच्या दरवाजाकडे पहात, अडखळणाऱ्या घोगऱ्या आवाजांत ) शेवटचं दर्शन, स्वारीचं शेवटचं दर्शन ! आणि माझ्या छकुडयांना तरी आतां कुठें मी परत पहाणार !–विहीरीच्या काळयाकभिन्न तळाशीं एकदां गेल्यावर मग काय–मग सगळंच संपलं. आतां वाचीत असतील–आतां वाचीत असतील तें पत्र ! जावं बाई–जाव आतां–आई, संभाळ ग माझ्या बाळांना ! ( दरवाजाकडे ती जाणार-इतक्यांत रमाकांत खाड्कन खोलीचें दार उघडून बाहेर येतो. )

रमाकांत : ( हातांत उघडलेलं पत्र धरून कांपणाऱ्या आवाजांत ) लता !

लता : ( वळून ) काय ?

रमाकांत : काय हें ? यांत काय लिहिलं आहे हें ?

लता : होय, सगळं माहीत आहे मला. जातें मी, जाऊं द्या मला.

रमाकांत : ( तिचा हात धरून ) कुठें जातेस तूं ?

लता : ( हात सोडविण्याचा प्रयत्न करीत ) नाहीं, नाहीं, जाऊं द्या मला !

रमाकांत : काय ? हें सर्व खरं आहे, लता ? –छे, छे. शक्यच नाहीं. खोटी गोष्ट !

लता : अगदीं खरं –अगदीं खरं आहे सर्व तें. साऱ्या जगांत तुमच्यापेक्षां मला दुसरं कांहींच प्रिय नाहीं. तुमच्या जिवासाठीं मी कांहींहि केलें असेल.

रमाकांत : बस. बस. अचरट सबबी मला नको आहेत.

लता : ( जरा पुढें येऊन ) अं ?

रमाकांत : काय केलंस हें ?

लता : जातें मी–जातें मी. माझ्यासाठीं तुम्ही आपल्या अंगावर

दोष घेऊं नका.—तुमच्या जिवाला माझ्यामुळें त्रास होऊं देऊं नका, गडे.

**रमाकांत** : नाटकी भाषणं नको आहेत मला. ( कोचाकडे बोट दाखवून ) बस तिथं आणि सांग मला सर्व. कल्पना आहे तुला, तूं काय केलंस त्याची ? बोल, बोल, आहे कल्पना तुला ?

**लता** : ( दीर्घकाल त्याच्याकडे रोखून पहाते. पुढील शब्द बोलत असतां त्याच्याविषयींच्या तिच्या कोमल व प्रेमळ भावना करपून जाऊन तिचा चेहरा निर्विकार व करारी होतो. ) होऽय. आतां अगदीं पूर्ण कल्पना येऊन माझ्या डोक्यांत स्वच्छ प्रकाश पडत आहे.

**रमाकांत** : ( दिवाणखान्यांत इकडे तिकडे येरझाऱ्या घालीत ) किती भयंकर रीतीनें माझे डोळे उघडले हे !—आठ वर्षं—आज आठ वर्षं जिला जिवापलीकडेहि जपलं—प्राणापेक्षांहि जिच्यावर प्रेम केलं—माझं सर्वस्व—माझं आनंदनिधान—ती—ती लता खोट्या जिभेची एक फसवी स्त्री—छे, छे—नुसती फसवी नव्हे—दीडदमडीच्या बदमाषानें करण्यासारखा गुन्हा करणारी—छे छे,—विचारहि नको त्या घाणेरड्या गोष्टीचा—कोण लाजिरवाणी स्थिति ही ! ( लता स्तब्ध उभी आहे. तो तिच्या समोर उभा रहातो. ) मला हें अगोदरच समजायला पाहिजे होतं ! असं कांहीं तरी होणार हें मला कळायला पाहिजे होतं—तुझ्या वडिलांचं चारित्र्य तरी काय मोठं—( तिचें तोंड उघडल्यासारखें दिसतें ) चूप बस् ! होय, होय, माहीत आहे तुझे वडील कसे होते ते ! वागण्यांत तत्व नाहीं—एक मार्ग नाहीं—आयुष्याला कसल्याहि उदात्त ध्येयाचं वळण नाहीं ! असल्या खाणींतली माती कसली असणार हें मला कळायला पाहिजे होतं ! पण तुझ्यावरील प्रेमानं आंधळा होऊन मीं तुझा स्वीकार केला—दुसरा तिसरा विचार मीं केला नाहीं. आणि त्या सर्वांचं प्रायश्चित्त, आतां तूं मला असं देते आहेस ?

**लता** : होय, अगदीं तसंच !

**रमाकांत** : या करणीनं माझ्या सुखाची तूं राखरांगोळी करून टाकलीस ! माझ्या सर्व आशा, आकांक्षा तूं धुळीला मिळविल्यास, —आतां या पुढल्या भविष्यकाळच्या नुसत्या विचारानेंहि अंगावर शहारे येतात ! कसलाहि पाजीपणा करावयाला मागेंपुढें न पहाणाऱ्या त्या एका बदमाष रामनाथाच्या कचाट्यांत आतां मी कायमचा सांपडलों. आतां तो माझं कांहींही करील. पाहिजे तें मागेल—तो सांगेल तें मला करावं लागेल ! आणि 'नाहीं' म्हणायला मला तोंड रहाणार नाहीं ! आणि माझी ही सर्व दारुण दशा—हो दारुण दशा—कां ? तर एका अविचारी स्त्रीमुळं !

**लता** : पण, तुमच्या आयुष्यांतून मी नाहींशी झालें, म्हणजे तुम्ही मोकळे होणार नाहीं कां ?

**रमाकांत** : तुला सांगितलं ना मी एकदां कीं नाटकी भाषणं नको आहेत मला म्हणून ! आपले वडीलहि असल्या भाषणांत मोठे तरबेज होते ! तूं म्हणत्येस त्याप्रमाणें तूं माझ्या मार्गांतून निघून गेलीस, म्हणजे माझा काय फायदा होणार आहे, तुला वाटतं ? कांहीं माझा फायदा नाहीं त्यांत. तो बदमाष ही गोष्ट गांवभर करील आणि एकदां कां ही गोष्ट घट्कर्णी झाली कीं, जो तो तुझ्या या करणीच्या मागें माझाच हात आहे, असं म्हणेल; मीच तुला तसं करायला शिकवलं, असं लोक म्हणणार—लग्नाच्या दिवसापासून फुलासारखी तुला वागवली—जीव कीं प्राण केलं—त्याचा असा हा मोबदला मला दिलास तूं ! समजलं आतां हें काय केलंस तूं तें !

**लता** : ( अगदीं संथपणें, हृदयशून्य, निष्प्रेम आवाजांत ) होय.

**रमाकांत** : हें सर्व इतकं विलक्षण आणि अनपेक्षित झालं आहे, कीं माझं डोकं बधिरल्यासारखंच झालं आहे. काय करावं तेंच मला समजत नाहीं. पण कांहीं तरी मार्ग हा काढलाच पाहिजे.—तो पदरबिदर सोडा कमरेचा, नि बसा नीट. पहातेस काय ?—त्या बदमाषाचं तोंड केलंच पाहिजे मला बंद. कांहींहि करून ही भानगड मिटवलीच पाहिजे. आणि आतां दुसरी गोष्ट, तुझा माझा संबंध—जणूं कांहींच

झाल नाही अशाप्रमाणें पूर्वीसारखाच राहूं द्यावयाचा.—पण अर्थात् तें सर्व लोकांना दाखवण्यापुरतं. पूर्वीसारखं तुझ्याशीं वागणं मला शक्यच नाहीं-मात्र तूं जरी या घरांत असलीस, तरी मुलांना शिकवण्या-सवरण्याचं काम तुझं नाही. तुझ्यासारख्या कमजात चारित्र्याच्या बाईच्या हाताखालीं माझ्या मुलांचं शिक्षण होतां उपयोगी नाहीं. किती दुःख होतं मला हें सर्व बोलतांना. जिच्यावर एकदां अलोट प्रेम केलं आणि जिच्यावर अजूनहि—पण छेः नाहीं, नाहीं, मुळींच नाही. प्रेम वगैरे तें सर्व आतां संपलं ! यापुढें आतां प्रेमाचा आणि सुखाचा प्रश्न नाहीं. प्रेम—आतां फक्त जगापुढें एकत्र संसाराचा देखावा करावयाचा—केवळ अब्रूसाठीं—( दरवाजावर कुणीतरी ठोकल्याचा आवाज ऐकूं येतो. )

**रमाकांत** : ( दचकून ) कोण या वेळेला ? रामनाथच नाहीं ना आला मजा बघायला आमची आतां ? जा, खोलींत जा निघून. ( दरवाजा उघडतो. एक गडी हातांत पत्र देऊन निघून जातो. ) त्याचंच हें पत्र. ‌झ्या नांवचं आहे. पण मला वाचून पाहिलंच पाहिजे.

**लता** : हं वाचा.

**रमाकांत** : ( लिफाफा फाडीत वाचायला दिव्याकडे जातो. ) धीर नाहीं होत वाचायला. कदाचित् आपलं वाटोळं करायचा विचार असेल त्याचा ! कांहींही असो. पत्र वाचलंच पाहिजे. ( पत्र बाहेर काढून कांही ओळी वाचतो. नंतर लिफाफ्यांतून दुसरा एक कागद बाहेर काढतो; आणि आनंदानं ओरडून ) लता ! ( ती त्याच्याकडे आश्चर्यानें पहाते. ) लता !—नाहीं, पण पुन्हां एकदां वाचतों—खरंच—खरंच लता ! सुटलों मी लता, साफ सुटलों !

**लता** : आणि मी ?

**रमाकांत** : तूं सुद्धां ग ! आपण दोघंही ! हा बघ ! त्यानं तुझा तो बॉडसुद्धां परत पाठवलाय. तो म्हणतो कीं, त्याच्या आयुष्यांत एक अत्यंत आनंदाचा प्रसंग घडला आहे, नी त्याला आतां पश्चात्ताप

होतो कीं आपण—पण त्याचा जळो आनंद नि पश्चात्ताप !—आपण मात्र सुटलों, लता, अगदीं दोघंहि सुटलों ! आतां तुला कुणी कांहींही करूं शकणार नाहीं—पण अगोदर मला हा दुष्ट कागद जाळून, होता कीं नव्हता केला पाहिजे—( कागदाकडे पहातो. ) होय, तोच. अगदीं दृष्टीपुढें नको तो आतां ! ( त्या कागदाचे आणि पत्राचे तुकडे तुकडे करतो व टेबलावरची काड्याची पेटी घेऊन ते तुकडे पेटवितो. ) जळाला ! जळाला !—तो पत्रांत म्हणतो, लता, कीं गेले दिवाळीचे दोन दिवस तुला कोण यातना नि त्रास !

**लता** : होय, गेले दोन चार दिवस मला स्वतःच्या मनाशीं अगदीं भयंकर झगडा करावा लागला.

**रमाकांत** : आणि किती वेदना नि यातना झाल्या असतील तुझ्या मनाला—पण जाऊ द्या तें आतां. आपण आतां तें विसरलं पाहिजे. आणि आनन्दी आनन्द केला पाहिजे, गडे. झालं गेलं तें आतां. लता, झालं गेलं तें असं अजून वाटत नाहीं तुला ? हें काय बरं ? असं काय लता ? असा दगडासारखा चेहेरा करून कां बरं अजून तूं उभी ? —हं, समजलों. मीं तुला सर्व कांहीं विसरून मनापासून क्षमा केली आहे, यावर तुझा अजून विश्वास बसत नाहीं, असंच ना ? खरंच मीं तुला क्षमा केली आहे लता ! खरंच, अगदीं सर्व सर्व गोष्टींची क्षमा केली आहे. मला एवढं कळत नाहीं वाटतं, कीं, तूं जें केलंस तें केवळ माझ्या प्रेमामुळें केलंस म्हणून ?

**लता** : खरं आहे तें.

**रमाकांत** : होय. आपल्या पतीवर पत्नीनें ज्या तऱ्हेचं प्रेम केलं पाहिजे, अगदीं तसंच तूं माझ्यावर प्रेम केलंस. फक्त तसं करतांना तुझ्या हातून काय गोष्ट घडते आहे, हें समजण्याइतकी तुला विचार-शक्ति नव्हती—पण स्वतःच्या जबाबदारीवर काय करावं नि काय करूं नये हें तुला कळत नाहीं, म्हणून तूं मला कांहीं कमी प्रिय नाहींस. —उलट माझ्या मदतीशिवाय या गोष्टी तुला करतां यायच्या नाहींत, याचा मला अभिमानपूर्वक आनन्द वाटतो.

खरंच, त्यामुळें माझं प्रेम द्विगुणित होतं! तुझ्या अजाणपणामुळ मला तूं जास्त लाडकी वाटतेस. तें पत्र पाहिल्याबरोबर भांबावून जाऊन रागाच्या भरांत मी तुला वाटेल तसं ताडताड टाकून बोललों खरा, पण मी तरी काय करूं लता? मला तेव्हां वाटलं, आतां अगदीं मी ठार बुडालों. विसरणार ना तें आतां, गडे? खरंच अगदीं पूर्ण क्षमा केली आहे मीं तुला, लता. खरंच अगदीं मनापासून.

**लता** : अत्यंत उपकार आहेत आपले माझ्यावर. ( उजव्या बाजूच्या खोलींत जाते. )

**रमाकांत** : हें काय? आंत कशाला जातेस? ( खोलींत पाहून ) काय करते आहेस तूं?

**लता** : ( आंतून ) कपडे बदलते आहें मी.

**रमाकांत** : होय, खरंच, त्या नव्या कपड्यांचं ओझं काढ एकदां. किती त्रास झाला असेल तुला! आतां अगदीं थंऽऽड पडून रहा. कुण्णी–कुण्णी आतां माझ्या भेदरलेल्या पांखराला त्रास देणार नाहीं. कसलंही संकट आलं तरी माझ्या छातीचा कोट करून मी तुला संभाळीन, लाडके! खरंच लता! ( खोलीच्या दरवाजावर इकडे तिकडे येरझाऱ्या घालतो. ) आपलं घर किती छान्, आणि शांत आहे. कुण्णी–कुण्णी आपल्याला इथें त्रास देऊं शकणार नाहीं. अगदीं निर्धास्त रहा तूं आतां, लता. वाघाच्या जबड्यांतून मोठ्या मुष्किलीनें सोडविलेल्या हरणासारखं मी तुला संभाळीन गडे,–यापुढें अगदीं कांहीं–कांहीं तुझ्या जिवाला मी त्रास होऊं देणार नाहीं. फार लांब कशाला? उद्यां सकाळींच पहा तुला किती बरं वाटेल तें! सगळं हें आजचं विसरून जाशील उद्यां. आठवण सुद्धां रहाणार नाहीं तुला याची. अगदीं पहिल्या-सारखीं आपण दोघं राहूं. खरंच तुला मीं क्षमा–अगदीं मनापासून क्षमा केली आहे, हें तुला पुन्हां पुन्हां मला सांगावं सुद्धां लागणार नाहीं. तुझी आपोआपच खात्री होईल माझ्यासंबंधीं. ( जरा

हंसून ) तुला टाकून द्यावी किंवा तुझ्यावर सगळा दोष घालावा असं मला मनापासून कधीं तरी वाटलं असेल, असं वाटतं तुला लता ? पुरुषाचं खरं अंतःकरण कसं असतं याची तुला कल्पना सुद्धां येणार नाहीं, लता ! आपल्या बायकोला आपण क्षमा—अगदीं मोकळ्या मनानें, मनापासून क्षमा केली आहे, या कल्पनेनें पुरुषाला जो गोड, उदात्त आनंद होतो त्याची मजा कांहीं और आहे ! त्या वेळेपासून पुरुषाला ती अधिकच आपलीशी वाटूं लागते. पतीसारखं प्रेम तर करावंच, पण पित्यासारखी तिची काळजी घ्यावीशी वाटूं लागते. आपण तिला, जणूं काय पुनर्जन्मच दिला असं वाटतं - लता, लाडके, अगदीं अस्सा माझ्या या चिमण्या, नाजूक पांखराला मी संभाळणार ! आतां काळजीच नको तुला कसली. मात्र यापुढें अगदीं सगळं सगळं मला सांगायचं आणि मला विचारल्याशिवाय कांहीं करायचं नाहीं हं !

( लता नेहेमींच्या कपड्यांत, हातांत एक बॅग घेऊन व पायांत चपला घालून बाहेर येते. रमाकांत आश्चर्यानें चमकून तिच्याकडे पहातो. ) अं :, हें काय ?

**लता** : कां ? ( घड्याळाकडे बघून ) फार नाहीं वाजले.

**रमाकांत** : म्हणजे ?

**लता** : बसा. सांगतें. मला पुष्कळ बोलायचं आहे तुमच्याशीं. ( टेबलाजवळील खुर्चीवर बसते. )

**रमाकांत** : असं काय ? एकाद्या अनोळख्या माणसासारखा निर्विकार चेहेरा करून बोलते आहेस माझ्याशीं ?

**लता** : बसा तुम्हीं इथं.—मला बरंच बोलायचं आहे तुमच्याशीं.

**रमाकांत** : ( तिच्या समोरील खुर्चीवर बसतो ) लता, अशी घाबरवूं नको मला. काय, झालं काय ? कांहींच समजत नाहीं मला तुझं हें ?

**लता** : अगदीं खरं आहे ! तुम्हांला मी काय आहे हें समजत नाहीं. आणि मला तुम्हीं काय आहां हें समजलं नव्हतं,—निदान तरी

आज रात्रीपर्यंत. ( रमाकांताचें तोंड हलल्यासारखें होतें ) हं, मध्येंच मला थांबवूं नका. कृपा करून ऐका मला काय सांगायचं आहे तें. मला आपणांमधील सर्वच गोष्टींचा आज निकाल लावायचा आहे, समजलं ?

**रमाकांत** : म्हणजे ?

**लता** : ( कांहीं वेळ स्वस्थ त्याच्याकडे पहात राहून ) जरा चमत्कारिक नाहीं वाटत तुम्हांला, आज आपण अशा तऱ्हेनें बोलत बसलों आहोंत तीं ?

**रमाकांत** : म्हणजे ?

**लता** : आपल्या लग्नाला जवळजवळ आठ वर्षें होऊन गेलीं, नाहीं ?

**रमाकांत** : मग ?

**लता** : तेवढ्या अवधींत, अशा तऱ्हेनें नवराबायको म्हणून संसारांतल्या एका तरी गोष्टीसंबंधानें आपण गंभीरपणें बोलत बसलों होतों कां ?

**रमाकांत** : गंभीरपणें म्हणजे ?

**लता** : या आठ वर्षांत–आठ कां जास्त–संसारांतल्या अनेक बाबतींपैकीं एकीसंबंधीं तरी आपणां दोघांत कधीं गंभीर चर्चा झाली आहे का ?

**रमाकांत** : रोजच्या व्यवहारांतल्या नानातऱ्हेच्या भानगडी, चिंता नी काळज्या मीं तुला सांगत बसायला पाहिजे होतं, असं तुला वाटतं होय ? बरं, त्या तुला सांगून तुझा मला त्यांत उपयोग तरी काय होणार होता ?

**लता** : मी तुमच्या बाहेरच्या धंदा–व्यवहाराच्या गोष्टी बोलत नाहीं. माझं एवढंच म्हणणं, कीं आपण दोघांनीं शांतपणें एका ठिकाणीं बसून एका तरी गोष्टीचा खोलपणें विचार केला आहे का ?

**रमाकांत** : पण लता, त्याचा कांहींतरी तुला उपयोग झाला असता का ?

**लता** : हेंच तें ! मी काय आहें हें तुम्हांला कधीं समजलंच नाहीं. माझं दोऽन व्यक्तींनीं भयंकर नुकसान केलं आहे—पहिल्यांदा बाबांनीं आणि नंतर तुम्हीं !

**रमाकांत** : काय ? आम्हीं दोघांनीं ?—स्वतःच्या जीवापलीकडेहि ज्या दोघांनीं तुझ्यावर प्रेम केलं, त्या आम्हीं दोघांनीं ?

**लता** : ( डोकं हालवीत ) नाहीं, नाहीं—प्रेम असं माझ्यावर तुम्हीं मुळींच केलं नाहीं,—माझ्यावर तुमचं प्रेम आहे या गोड कल्पनेंतच तुम्हांला आनंद होत होता.

**रमाकांत** : लता, लता, काय बोलतेस तूं हें ?

**लता** : अगदीं खरं, खरं बोलतें आहे. जेव्हां माहेरीं होतें, तेव्हां बाबा प्रत्येक गोष्टीसंबंधीं मला आपलं स्वतःचं मत सांगत असत; आणि मलाहि त्या गोष्टीसंबंधानें माझंहि मत तेंच आहे, असं म्हणावं लागत असे. कां ?—तर, माझं मत निराळं आहे असं सांगायचा मीं धीर केला असता, तर बाबांना वाईट वाटलं असतं ! ते मला ' आपली लाडकी बाहुली ' म्हणत असत. आणि शाडूच्या बाहुल्यांबरोबर जशी मी खेळत असे, तसे माझ्या-बरोबर ते खेळत असत ! आणि नंतर—नंतर मी तुमच्याकडे रहायला आल्यापासून—

**रमाकांत** : अंः—आपल्या वैवाहिक आयुष्यासंबंधीं काय हे शब्द वापरतेस ?—माझ्याकडे रहाणं—अं.

**लता** : ( शांतपणें ) होय, माझं एवढंच म्हणणं कीं, बाबांची बाहुली त्यांच्या हातांतून तुमच्या हातांत आली ! तुम्हांला आवडेल तशी तुम्ही आपल्या संसाराची मांडणी करीत होतां—आणि अर्थात् तुमची आवड तीच माझी आवड होती.—आतां, खरोखर तशी माझी आवड होती, कीं मी तसं ढोंग करीत होतें, कुणाला ठाऊक ! कदाचित् तसंही असेल ! कारण माझी तशी आवड नाहीं असं मीं म्हटलं असतं, तर तुम्हांला तें आवडलं नसतं !—आपल्या मागल्या आयुष्याचा जेव्हां मी विचार करतें, तेव्हां मला

असं वाटतं, कीं केवळ अन्नावारी राबणाऱ्या एखाद्या गरीब स्त्री-सारखं माझं आयुष्य होतं! खायचं, प्यायचं आणि हंसून खिद्-ळून–नाचून बागडून तुमचं मन रिझवायचं हीच माझी इति-कर्तव्यता होती! पण तेंच तुम्हांला हवं होतं! तुम्ही आणि बाबांनीं माझा घोर अपराध केला आहे. माझ्या जीवनाची अशी दशा होण्याचं कारण तुम्ही दोघे!

**रमाकांत** : तुझ्या बोलण्यांत कांहीं अर्थ आहे का? किती कृतघ्न आहेस तूं लता? माझ्या घरीं तूं सुखी नव्हतीस का?

**लता** : नाहीं, नव्हतें, कधींच नव्हतें! मला वाटत होतं, कीं मी होतें म्हणून. पण तसं खरोखर मुळींच नव्हतं.

**रमाकांत** : *काय? –तूं सुखी नव्हतीस?*

**लता** : नव्हतें, सुखी नव्हतें. नुसत्या पोरकट आनन्दांत होतें! तुम्ही माझी काळजी घेत होतां, आणि मोठ्या सदयतेनें मला वागवत होतां, हें खरं आहे. पण आपला संसार म्हणजे भातुक-लीचा खेळ होता! जशी माहेरीं मी बाबांची 'लाडकी बाहुली' होतें, *तशी तुमची मी इथं 'खेळांतली बायको'* होतें! माहेरीं मला शाडूच्या बाहुल्या होत्या खेळायला; आणि इथें–तुमच्या इथें माझीं मुलं माझ्या बाहुल्या! त्या चिमुकल्यांशीं मी खेळतांना, त्यांना जसा आनन्द होत असे, तसाच तुम्ही माझ्याशीं 'संसाराचा खेळ' खेळतांना मला होत असे. आपला संसार हा असा होता, समजलं?

**रमाकांत** : *तूं म्हणतेस त्यांत थोडंसं सत्य आहे*–तूं मात्र त्याचा फार बाऊ करते आहेस. –तें मागचं जाऊं दे. पण यापुढें तरी आपला संसार निराळा व्हायला कांहीं हरकत नाहीं. म्हणतातना, 'खेळायच्या वेळीं खेळावं, आणि धड्याच्या वेळीं धडे घ्यावे.'

**लता** : कुणाला धडे देणार आपण? –मला कीं आपल्या बाळांना?

**रमाकांत** : लता, असं काय? –दोघांनाही. माझी ना तूं?

**लता** : अंहं! लायक पत्नी व्हायचं शिक्षण मला द्यायला आपण खास पात्र नाहीं.

रमाकांत : लता ! तूं,–तूं हें बोलते आहेस ?

लता : मी ? कां बरं ? आपल्या मुलांना शिकवण्यासवरण्याचं काम माझ्यासारख्या ' कमजात चारित्र्याच्या बाईच्या ' हाताखालीं होणं शक्य नव्हतं ना ?

रमाकांत : लता ?

लता : नाहीं बोललांत तुम्ही थोड्याच वेळापूर्वी असं ?

रमाकांत : रागांत मी बोलून गेलों असेन तसं, लता. पण त्यालाच धरून कां बसतेस तूं एवढी ?

लता : नाहीं, नाहीं. अगदीं खरं बोललांत तुम्ही तें. खरोखरच माझ्या मुलांना शिक्षण द्यायची माझी लायकी नाही. तें कर्तव्य करण्यापूर्वीं मला दुसरं कर्तव्य पार पाडलं पाहिजे. आयुष्यांतले धडे, माझे मीं स्वतः घेतले पाहिजेत पहिल्यांदा !–आणि तें काम माझ्यासाठीं तुम्ही करूं शकणार नाहीं. तें मीं स्वतःच केलं पाहिजे, आणि म्हणूनच मी तुम्हांला सोडून ही अशी निघून जाते आहे.

रमाकांत : ( एकदम ताड्कन उठून ) काय म्हणतेस ?

लता : मला स्वतःची लायकी जर जाणावयाची असेल,–आणि आयुष्यांतले धडे शिकायचे असतील, तर तें काम मला एकटीला स्वतःच्या हिंमतीवरच केलं पाहिजे. आणि म्हणूनच यापुढें एक क्षणभरहि मी तुमच्या इथें राहूं शकत नाहीं.

रमाकांत : लता, लता !

लता : ही आत्तां अशी चाललेंच मी इथून. रात्रीची वेळ असली तर मुक्ताचं घर जवळच आहे. ती खात्रीनें मला आसरा देईल.

रमाकांत : खास तुला वेड लागलंय ! मी मुळींच जाऊं देणार नाहीं तुला ! बस्. असलं भलतं सलतं कांही एक करायचं नाहीं.

लता : यापुढें मला ' असं करूं नको नि तसं करूं नको ' सांगणं व्यर्थ आहे ! माझं स्वतःचं असं जें कांहीं आहे तेवढंच घेऊन मी जाणार. तुमचं कांहींही घेणार नाहीं–आत्तांच नव्हे तर यापुढेंहि !

**रमाकांत** : काय, हा वेडेपणा आहे तरी कोणत्या तऱ्हेचा ?

**लता** : आजची रात्र मुक्ताकडे राहीन; आणि मग काय करायचं तें उद्यां ठरवीन.

**रमाकांत** : मूर्ख पोरी—

**लता** : होय मूर्ख ! म्हणूनच मला आतां हा प्रयत्न करून थोडासा शहाणपणा शिकला पाहिजे.

**रमाकांत** : आपलं घर, आपला नवरा, आपलीं साजरीं गोजरीं मुलं सोडून तूं चालती होणार ? लोक काय म्हणतील याचा तरी विचार केला आहेस का ?

**लता** : काय म्हणून विचार करूं मी त्याचा ? मला एवढं स्पष्ट कळतं आहे, कीं असं केल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं.

**रमाकांत** : काय भयंकर बोलते आहेस तू हें ? आणि असं करून स्त्रीला अत्यंत अवश्य असलेल्या अशा आपल्या कर्तव्यापासून तूं च्युत होणार ?

**लता** : कोणतीं तीं माझीं अत्यंत पवित्र कर्तव्यं ?

**रमाकांत** : तुला तीं सांगितलीं पाहिजेत होय ? आपल्या पतीसंबंधीं आणि मुलांसंबंधीं तुला कांहींच कर्तव्यं नाहींत काय ?

**लता** : त्यांच्या इतकींच दुसरीं पवित्र कर्तव्यं मला आहेत.

**रमाकांत** : शक्यच नाहीं. काय असणार अशीं कर्तव्यं ?

**लता** : माझ्यासंबंधींचं माझं कर्तव्य.

**रमाकांत** : या सर्वां आधीं तूं पत्नी आणि माता आहेस हें लक्षांत ठेव.

**लता** : त्या नाटकी गप्पा मीं आतांपर्यंत खूप ऐकल्या आहेत ! इतःपर त्यांवर माझा विश्वास नाहीं. माझा आतां एकाच गोष्टीवर विश्वास आहे. आणि ती ही कीं, मीहि तुमच्यासारखाच एक धडधाकट, बुद्धि शाबूत असलेला मनुष्यप्राणी आहें,—निदान तसं होण्याचा मला प्रयत्न तरी केला पाहिजे, हें खास. एवढं खरं, आणि त्याबद्दल माझी खात्री आहे, कीं तुमच्याप्रमाणें विचार

करणारींच माणसं खूप आहेत, आणि तीं तुम्हीं म्हणतां तेंच बरोबर म्हणतील. जाडयाजाडया पुस्तकांतूनही तेंच लिहिलं आहे. पण लोक काय म्हणतात आणि पुस्तकांतून काय सांगितलं आहे, त्यानं माझं इतउत्तर समाधान होणं शक्य नाहीं. सर्व गोष्टीच्या संबंधानं माझा मींच विचार केला पाहिजे, आणि त्या समजून घेतल्या पाहिजेत.

**रमाकांत** : स्वतःच्या घरीं राहून या गोष्टी तुला करतां येणार नाहींत का ? असल्या गोष्टींत अचुक मार्ग दाखविणारा मार्गदर्शक तुला इथं मिळेल त्याचा विचार केला आहेस का ? कांहीं नीतिधर्म तुला आहे कीं नाहीं ?

**लता** : खरंच, धर्म म्हणजे काय तें मला अजून नीटसें कळलेलं नाहीं.

**रमाकांत** : काय, म्हणतेस काय तूं ?

**लता** : काय ? खरं तेंच बोलतें आहे. शास्त्रीपुराणिकांच्या बडबडी-शिवाय धर्माविषयीं मला दुसरं कांहींच माहिती नाहीं. धर्म म्हणजे अमुक आणि धर्म म्हणजे तमुक, असं ते म्हणतांना मीं ऐकलं आहे. मी स्वतःच्या हिमतीवर राहूं लागलें म्हणजे याही गोष्टीचा विचार करीन. नंतर पाहीन मी, कीं शास्त्रीपुराणिकांच्या त्या बड-बडींत कांहीं तथ्य आहे किंवा काय ? निदान माझ्या अनुभवांशीं तरी त्यांतलं कांहीं जुळतं किंवा नाहीं ?

**रमाकांत** : तुझ्या वयाच्या पोरीनें असं बोलणं म्हणजे अगदीं मर्यादेपलीकडचं आहे ! पण धर्म जर तुझा मार्ग तुला दाखवीत नाहीं, तर निदान तुझ्या सदसद्विवेकबुद्धीला तरी मला जागी करूं दे. कांहीं नीतिअनीतांची तरी कल्पना तुला आहे कीं नाहीं ? कीं तेंही नाहीं ?

**लता** : हें पहा, हा प्रश्न तितकासा सोपा नाहीं. खरंच, मला कल्पना नाहीं. खरोखरच ही गोष्ट मला बुचकळ्यांत पाडते. एवढं मात्र मला ठाऊक आहे कीं, या बाबतींत तुमच्या आणि माझ्या कल्पनेंत फार अंतर आहे. कायदा–कायदा म्हणतात, तीही गोष्ट

कांहीं भलतीच आहे, असं मला वाटूं लागलं आहे. कायदा बरोबर आहे अशी माझी खात्रीच पटत नाहीं. मरणाच्या दारांत पडलेल्या आपल्या वृद्ध वडिलांना त्रास होऊ नये म्हणून, किंवा आपल्या पतीचे प्राण वांचवावे म्हणून एखाद्या बाईला एका कागदावर दुसऱ्याची साधी सहीही करायचा हक्क नाहीं म्हणे!

रमाकांत : लहान पोरासारखी कांहीं तरी बडबडते आहेस! ज्या जगांत आपल्याला रहायचं आहे, त्यांतील परिस्थितीची तुला कांहींच कल्पना नाहीं.

लता : होय. खरंच नाहीं. पण आतां मात्र मी प्रयत्न करून बघणार आहे. जगाचं म्हणणं बरोबर आहे, कीं माझं म्हणणं बरोबर आहे, हें पटवून घेण्याचा मी प्रयत्न करणार आहें.

रमाकांत : लता, तुला बरं वाटत नाहीं . भ्रम झाल्यासारखी तूं बोलते आहेस. मला वाटतं जवळ जवळ तुझं डोकं फिरलं आहे.

लता : छेः, उलट आज माझे डोळे उघडल्यासारखे मला वाटताहेत. इतक्या स्पष्टपणें नी न कचरतां माझ्या मेंदूनें कधींच विचार केला नव्हता.

रमाकांत : आणि स्वतःच्या नवऱ्याला आणि मुलांना इतके डोळे उघडे ठेवून तूं सोडून जात आहेस?

लता : होय. अगदीं सत्य.

रमाकांत : इतउत्तर माझ्यावर तुझं प्रेम नाहीं?

लता : होय, खात्रीनें तसंच.

रमाकांत : ( ओरडून ) लता! तूं असं–

लता : खरंच मला किती किती दुःख होत आहे हें बोलतांना. तुम्हीं मला फार चांगल्या तऱ्हेनें वागवीत होतां; पण माझा नाइलाज आहे. खरंच, माझं इतउप्पर तुमच्यावर प्रेम नाहीं.

रमाकांत : ( मन शांत करून ) हीही अगदीं उघडया डोळ्यांनीं पूर्ण विचार करून तुझी खात्री झाली आहे!

लता : होय. अगदीं पूर्ण. आणि म्हणूनच इतउत्तर इथं रहाणं

मला शक्य नाहीं.

**रमाकांत** : असं काय मी केलं, कीं ज्यामुळें तुझं प्रेम असं एकदम पार उडून गेलं ? सांगू शकशील तूं ?

**लता** : होय. शकेन. आज रात्री कांहीं तरी अलौकिक, दिव्य गोष्ट आपल्या दोघांच्या आयुष्यांत घडणार असं मला वाटत होतं. पण ती घडली नाहीं. तेव्हां माझी खात्री पटली, तुम्ही मला जसे वाटत होतां, तसे नाहीं.

**रमाकांत** : म्हणजे काय? मला कांहीं समजत नाहीं.

**लता** : आठ वर्षं आपल्या लग्नाला झालीं, नाहीं? प्रशांत वेळीं आपण दोघं एके ठिकाणीं असतांना, हृदयाला हृदय भिडवून किती वेळां तुम्ही म्हणालां होतां कीं माझ्यापेक्षां तुम्हांला कांहींच प्रिय नाहीं.—माझ्यासाठीं तुम्ही वाटेल तें कराल! आणि किती जीवाभावानें मीं तुमच्या खांद्यावर मान टाकली होती! माझी खात्री होती कीं आम्हां स्त्रियांना वाटणाऱ्या असल्या अलौकिक आणि दिव्य गोष्टी—ज्या वेळीं पुरुषांच्या आमच्यावरील प्रेमाची कसोटी लागते—त्या रोज रोज घडत नाहींत. तो प्रसंग आयुष्यांत एकदां केव्हां तरी येतो. आठ वर्षं वाट पाहिल्यावर गेल्या दोन दिवसांत हा भयंकर प्रसंग माझ्यावर आला, आणि अगदी भक्ति-भावानं मला वाटलं कीं शेवटीं ती अलौकिक, दिव्य गोष्ट घडणार. रामनाथाचं पत्र जेव्हां त्या पेटींत पडलेलं मीं पाहिलं, तेव्हां एक क्षणभरसुद्धां मला वाटलं नाहीं कीं त्याच्या अपमानकारक अटी कबूल करून तुम्ही त्याचं तोंड बंद कराल. माझी अगदीं मनोमन खात्री होती कीं, तुम्ही त्याला म्हणाल,—जा आणि सगळ्या जगाला ओरडून सांग आणि असं सांगितल्यावर—

**रमाकांत** : हें असं सांगितल्यावर काय? —माझ्या बायकोची सर्व जगांत बेअब्रु नि छीः थूः झाल्यावर मग काय ?

**लता** : आणि तितकाच माझा पुरेपुर विश्वास होता, कीं असं सांगितल्यावर तुम्ही बेडरपणें सर्व जगापुढें जाल, आणि छातीवर

हात ठेवून म्हणाल, कीं यांत माझ्या पत्नीचा कांहीं एक दोष नाहीं. याची सर्व जबाबदारी माझ्यावर आहे.

**रमाकांत** : लता !

**लता** : काय ? तुम्हांला वाटतं, माझ्यासाठीं एवढा भयंकर स्वार्थत्याग तुम्हीं केला असता, तर मला तें चाललं नसतं, होय ना ? होय, होय. खरंच मला तें चाललं नसतं. माझ्या वेडीच्या जीवासाठीं माझ्या लाडक्या पतीनीं स्वतःचं एवढं भयंकर नुकसान केलं असतं तर खरंच,—खरंच मला तें सहन झालं नसतं. आणि असली अलौकिक आणि दिव्य गोष्ट घडणार या खात्रीनेंच पदर कमरेला बांधून परसांतल्या काळ्याकभिन्न विहिरींत जीव द्यायला मी तयार झालें होतें.

**रमाकांत** : लता, लता ! तुझ्यासाठीं मी रात्रंदिवस राबलों असतों, उन्हातान्हांतून फिरलों असतों, उपाशीं मेलों असतों, पण —प्रिय माणसासाठीं झालं म्हणून स्वतःच्या नांवाला कोण काळिमा लावून घेईल ?

**लता** : कां ? आजपर्यंत शेंकडों—हजारों नायकांनीं हें केलं आहे.

**रमाकांत** : कशी अगदीं लहान पोरासारखी तूं कांहीं तरी विचार करते आहेस नि कांहीं तरी बोलते आहेस.

**लता** : असेल. पण तुम्ही मात्र ज्या तऱ्हेनें विचार करतां आहां आणि ज्या तऱ्हेनें बोलतां आहां, तसा विचार नि आचार असलेल्या माणसाशीं माझी जन्माची गांठ पडावी असं मला नाहीं वाटत. जेव्हां तुमच्यावरचं संकट टळलंसं तुम्हांला वाटलं—तें सुद्धां कसलं संकट ? आपल्या पत्नीवर भयंकर प्रसंग आला हें नव्हे, तर स्वतःच्या नांवलौकिकाला काळं लागण्याचा प्रसंग आला हें —तेव्हां, —तेव्हां तुम्ही एकदम पहिल्यासारखे झालांत. - तुमच्या धर्माधर्माच्या, नीति—अनीतीच्या कल्पना, तुमची तत्वनिष्ठा—सगळं सगळं पार उडून गेलं; आणि आतां आपण मागचं सर्व विसरून पुन्हां पहिल्यासारखीं वागूं या —पुन्हां बाहुलीचा संसार चालूं करूं

या —असं तुम्ही मला सांगूं लागलां ! जसं कांहीं कांहींच झालं नाहीं, अशी तुमची खात्री झाली ! पुन्हां मी तुमची मैना, बुल्बुल नि नाजुक पाखरूं झालें ! इतकंच नव्हे तर ही बाहुली केव्हां फुटेल नि तुटेल याचा नेम नाहीं, म्हणून यापुढें तुम्ही माझी दुप्पट काळजी घ्याल असं तुम्ही म्हणूं लागलां ! ( उठून उभी रहाते ) त्याच क्षणीं— त्याच क्षणीं – माझ्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला कीं, आठ वर्षं मी परपुरुषाच्या सहवासांत रहात होतें— इतकंच नव्हे तर त्याच्यापासून मला तीन मुलंहि झालींत ! नाहीं —नाहीं. मला आतां तो विचारहि सहन होत नाहीं ! स्वतःच्या देहाच्या चिंधक्या चिंधक्या करून टाकाव्याशा वाटतात !

**रमाकांत** : ( खिन्नपणें ) आलं लक्षांत माझ्या. खरं आहे लता. तुझ्या आणि माझ्या अंतःकरणांमध्यें एक खोल, रुंदच्या रुंद, काळीभोर दरी पसरली आहे खरी. पण, लता, ती ओलांडून आपलीं अंतःकरणं पुन्हां एकमेकांना मिळणं शक्य नाहीं का ?

**लता** : आतां ही मी आहे तशीच असतांना तुमची पत्नी म्हणून रहाणं शक्य नाहीं.

**रमाकांत** : पण माझ्यांत बदल होणं शक्य नाहीं का ?

**लता** : होईल कदाचित्—तुमची 'जिवंत बाहुली' तुमच्या हातांतून निघून गेली तर !

**रमाकांत** : पण तुझ्यापासून निराळं रहाणं—तूं माझ्याजवळ नसणं— नको, नको; लता, मला ती कल्पनाहि सहन करवत नाहीं.

**लता** : म्हणूनच तर मी इथून निघून जाणं फार, फार जरूरीचं आहे. ( बॅग उचलते. )

**रमाकांत** : लता, लता ! आतां तरी जाऊं नको, उद्यांपर्यंत तरी थांबून पहा.

**लता** : छे, छे. परपुरुषाच्या घरांत रात्र काढणं शक्यच नाहीं.

**रमाकांत** : कां ? आपण भाऊ बहीण म्हणून सुद्धां राहूं शकणार नाहीं का ?